तरुण सहजासहजीं तुझ्या वांट्याला येईल असं समजूं नकोस. त्याला तूं आवडतेसही, मला हें माहीत आहे. पण तूं पुरेशी सावध राहिली नाहींस तर त्याला पटकावयाला दुसऱ्या मुली तयार आहेत लक्षांत ठेव." आणि मग त्यांनीं चंद्राबाईच्या भारीबरोबर रेडिओ ऐकत नागेश रोज कसा बसतो त्याचं तिखटमीठ लावून वर्णन केलं.

बाबी म्हणाली, "असं" आणि ती मोठमोठ्यानं हसूं लागली.

इतक्यांत बाबीचे वडील घरीं आले तेव्हां जानकीबाईंनीं आपली नवी खरेदी त्यांना मोठ्या अभिमानानं दाखविली आणि रात्रीं फैयाजखांची सारंगी असल्याची बातमी त्यांनाही दिली. त्यांनीं कपाळाला आंठ्या घालून विचारलं, "किती वाजतां आहे सारंगी?" जानकीबाई म्हणाल्या, "नऊ वाजतां."

ते म्हणाले, "ठीक आहे. आम्हाला थोडीशी दशमी खायला द्या. आम्ही बाहेरच जातों कसे. तो रेडिओ आणि तुम्ही घाला गोंधळ. आतां आजपासून मुळीं मीं क्लबावर पत्ते खेळायलाच जातों."

त्याच्या त्या वैतागाचा जानकीबाईंना राग आला नाहीं. उलट त्यांनी विचार केला कीं, नागेश आणि बाबी फैयाजखांची सारंगी ऐकत बसतील तेव्हां हे घरांत नसलेलेच बरे. सुंठीवांचून नुसत्या दशमीनं खोकला जातो आहे. काहीं वाईट नाहीं.

जानकीबाईंनीं नजर वळवून पाहिलं तों बाबी रेडिओपुढं बसून तो लावून पहात होती. ती म्हणाली, "किती सुंदर ऐकूं येतंय ग."

"तूंच बघ." जानकीबाई म्हणाल्या. "आणखी वसंतराव सांगून गेलाय कीं रेडिओत काहीं बिघाड झाला तर मला फोन करा, मी ताबडतोब येईन."

"असं होय?" असं विचारतांना बाबीची मुद्रा अगदीं प्रफुल्लित झाल्याप्रमाणें कां दिसावी तें जानकीबाईंना उमगलं नाहीं.

आणि जेवण कधी नव्हे अशा घाईनं उरकून वर आपल्या माडीवर जाऊन नव्या साडी पोलक्यांचा थाट करून बाबी सव्वाआठ वाजतांच पुढच्या खोलींत येऊन बसली याचाही त्यांना विस्मय वाटला. नागेश

येणार म्हणून तिची अशी धादल उडालेली त्यांनीं पूर्वी कधीं पाहिली नव्हती. नव्या रेडिओची जादू म्हटलीं पाहिजे खरी, अशा कल्पनेनं त्या स्वतःशींच हंसल्या.

बरोबर साडेआठ वाजतां नागेशची स्वारी येऊन दाखल झाली. जानकीबाई मुद्दामच बाहेर गेल्या नाहींत. नागेश आणि बाबी यांचा संवाद त्यांना ऐकूं येऊं लागला. थोड्या वेळानं रेडिओंतून निघणारे आवाजही त्यांच्या कानीं पडूं लागले. सारं ठीक जमलं, अशा विचारानं त्यांनीं एक सुस्कारा सोडला.

पण दुसऱ्याच क्षणीं त्या एकदम दचकल्या कारण सुंदर संगीताऐवजीं रेडिओंतून टर्र फट्ट गुर्र भों असे भयंकर आवाज निघूं लागलेले त्यांनीं ऐकले, आणि शेवटीं तर फटफटीच्या मागच्या नळीतून निघावा तसा फाड फाड आवाज झाला.

तो ऐकतांच जानकीबाईनीं पुढल्या खोलीकडे धांव घेतली. त्यांनीं पाहिलें तों नागेश कपाळावर हात देऊन बसला होता. आणि बाबी रेडिओच्या बटनांची फिरवाफिरव करीत होती. टर्रफट्ट असे आवाज चालूच होते.

नागेश म्हणाला, " झालं! जानकीबाई, तुमचा बेत कांहीं तुमच्या घरीं पार पडायचा नाहीं. "

बाबी चटकन् म्हणाली, " असं दिसतंय लक्षण खरं..." नागेश, तुझी सारंगी बुडावी अशी काहीं माझी इच्छा नाहीं. अजून घरीं गेलास तर चंद्राबाईच्या रेडिओवर--"

जानकीबाईना तिच्या त्या बोलण्याचं फार आश्चर्य वाटलं. तिच्याकडे कटाक्ष टाकून त्यांनीं तें दाखविलंही. शत्रूच्या गोटात ही मुलगी आपल्या प्रियकराला सरळ लोटते आहे हिला म्हणावं काय अस त्याच्या मनांत आलं.

नागेश बाबीकडे पाहून म्हणाला, " तुझा रेडिओ लागत नसेल तर मला घरीं जाणं भागच आहे. "

तो आतां उठणार अशी भीति वाटून जानकीबाई म्हणाल्या, "बसा बसा हो. आमच्या रेडिओवर सारंगी ऐकवितें तुम्हांला. नऊ वाजायला पुष्कळ

अवकाश आहे अजून. आत्तां करतें वसंतरावाला टेलिफोन. तो येईल आणखी एका मिनिटांत रेडिओ दुरुस्त करील. ”

त्यांनीं वसंतरावाला टेलिफोन केला.

बाबी म्हणाली, “ आई, तूं नागेशचा घात करतेस हं. आत्तां नऊ वाजतील आणखी त्याची सारंगी बुडेल. दोन्ही घरचा पाहुणा उपाशी तशी गत होणार त्याची. ”

“ कांहीं बुडत नाहीं सारंगी. वसंतराव यायचा अवकाश कीं बघ रेडिओ फक्कड वाजायला लागेल.” जानकीबाई म्हणाल्या.

“ त्याचा कांही नियम सांगूं नकोस आई. ” बाबी म्हणाली. “ हे रेडिओ मोठे अडेल तट्टू असतात. नागेश, बघ बाबा तुला सारंगी ऐकायची असेल तर तू आपला–”

बाबीला सैपाकघरात बोलावून घ्यावी अन् तिच्या दोन मुस्काटांत द्याव्या अशी जानकीबाईना भयंकर इच्छा झाली.

पण तितक्यात वसंतराव येऊन दाखल झाला. “या वसंतराव–” त्यांच्याकडे बघत हंसून जानकीबाई म्हणाल्या, आणि त्यानीं बाबीला सांगितलं, “ ज्याच्याकडून आपण रेडिओ घेतला ते हे बरं काय. ”

बाबीनं वसंतरावाकडे पाहून अगदीं खास ठेवणीतलं गोड हास्य केलं आणि ती म्हणाली, “ तुम्हांला आम्ही भलत्या वेळीं तसदी देत आहोंत. माफ करा हं. ”

रेडिओकडे जातां जातां वसंतराव तिला म्हणाला, “ छे छे, तसदी कसली त्यांत ? ”

त्याच्याजवळ जाऊन बाबी म्हणाली, “एखाद्या डॉक्टरसारखीच तुमची गत आहे म्हणायची. केव्हा कोण बोलावील त्याचा नियम नाहीं.” ती हंसली.

“ हो तसं आहे खरं. ” असं म्हणून तोही हंसला.

रेडिओची दुरुस्ती मागं पडली आणि तीं दोघं रेडिओजवळ उभीं राहून व्यवस्थित गप्पा छाटूं लागली.

" तुम्हांला फार काम असेल नाहीं. कुठें इकडे तिकडे हिंडाय फिरायला, मजा करायला वेळ होत नसेल. "

" ते कां हो ? पुष्कळ होतो वेळ. "

" असं ? "

" हं. "

नागेश आपले दोन्ही हात छातीवर दुमडून आणि भिंतीवरच्या घड्याळा-कडे नजर देऊन बसला होता. अमक्या मिनिटावर कांटा येईपर्यंत वाट पाह्यची आणि नंतर उठून चालायला लागायचं असा वैतागाचा निश्चय जानकीबाईंनां त्याच्या चेहऱ्यावर स्पष्ट दिसला. त्या खसकन् ओरडल्या,

" बाबी, अग वसंतरावांना रेडिओ दुरुस्त करूं दे. बोलत काय राह्य-लीस त्यांच्याशीं ? "

वसंतराव म्हणाला, " असूं द्या हो माझी कांहीं हरकत नाहीं. "

नागेश एकदम म्हणाला, " पण माझी आहे. मला आणि बाबीला बुंदू-खांची सारंगी ऐकायची आहे. "

बाबी म्हणाली, " नाहीं ऐकायला मिळाली सारंगी तरी एवढं काय ! मला शास्त्रोक्त संगीत मुळींच आवडत नाहीं. मला फिल्मी गाणं फार आवडतं. तुम्हांला वसंतराव ? "

" मला सुद्धां फिल्मी गाण्याचा फार षोक आहे. सुरैय्या, नूरजहाँ—"

" झालं तर खुर्शीद—"

त्या दोघांचं व्यवस्थित संभाषणच सुरू झालेलं पाहून जानकीबाई म्हणाल्या, " हें पहा वसंतराव, तुम्हांला मीं रेडिओ दुरुस्त करायला बोलावलं आहे. "

" अरेच्या ! माझं काम विसरलोंच कीं. जानकीबाई तुम्ही अगदीं फिकीर करूं नका. रेडिओ एका मिनटांत दुरूस्त करतों, " असं म्हणून वसंतराव रेडिओच्या मागें गेला आणि रेडिओच्या पाठीचं ढापण काढून बाकून त्यानं आपले दोन्ही हात आंत घातले.

दुसऱ्याच क्षणीं टारटार असे आवाज झाले. ठिणग्या उडाल्या आणि वसंतराव किंकाळी फोडून सतरंजीवर पडला.

जानकीबाई, नागेश आणि बाबी तिघंही धांवून त्याच्या जवळ गेलीं. बाबी खाली बसली आणि त्याच्या कपाळावरून आणि केसांवरून हात फिरवूं लागली.

जानकीबाई नागेशकडे वळून ओरडल्या, " धावा, पळा. कोपऱ्यावरच्या दुकानांतून हुंगायची बाटली विकत आणा. "

नागेश धांवला. पाणी आणायसाठीं जानकीबाई सैपाकघरांत गेल्या. एखादा कांदा मिळाला तर तो ठेचून घ्यावा म्हणून त्यांनीं भाजीच्या टोपल्यात पाहिलं पण त्यांना कांदा सांपडला नाहीं. मग नुसतंच पाणी घेऊन त्या बाहेर आल्या. त्यानीं पाहिलं तों वसंतराव उठून बसला होता डोकं झटकीत होता. डोळ्यांची उघड झांक करीत होता. " असा धक्का मला जन्मात आजच प्रथम बसतोय, " तो सागत होता. " बटन बंद केलं असलं तरी कधीं कधीं रेडिओंत वीज शिल्लक असते. " त्यानं एकदां जानकीबाईकडे आणि बाबीकडे डोळे ताणून पाहिलं आणि म्हटलें, " आणखी कुणी त्यात केस कुरळे करायचे आकडे टाकून दिलेले असले म्हणजे तर विचारायलाच नको. "

त्याचे ते शब्द ऐकतांच जानकीबाई स्तंभितच झाल्या. रेडिओ कां बिघडला होता आणि कुणी बिघडविला होता हें कोडं त्यांना आतां उलगडल्यासारखं वाटूं लागलं. बाबीनं पोषाखाचा थाटमाट कुणासाठीं केला होता आणि सव्वा आठ वाजतांच येऊन ती रेडिओपाशीं कां बसली होती तें सारं आतां त्यांच्या लक्षांत आलं. त्या कांहीं बोलल्या नाहींत. त्यांनीं फक्त बाबीकडे नजर टाकली.

बाबी लाजून ' मला माफ करा हं ' अशा अर्थाच्या गोड नजरेनं वसंतरावाकडे पहात होती. वसंतरावही तिच्याकडे प्रेमळपणानं आणि ' तुला क्षमा केली हं ' अशा अर्थाच्या नजरेनं बाबीकडे पहात होता.

त्या दोघांकडे पाहतांच जानकीबाईच्या ध्यानांत सारा मजकूर आला.

तितक्यांत नागेश धांवत, धडपडत, धापा टाकीत आला. त्याच्या हातांत बाटली होती. वसंतराव आणि बाबी एकमेकांला खेटून बसलेलीं पाहून त्याच्या तोंडून उद्गार बाहेर पडला, " हं ! "

जानकीबाई पुढें झाल्या. त्यांनीं नागेशला दाराकडे नेत म्हटलं, " मला वाटतं आतां आमचा रेडिओ कांहीं दुरुस्त व्हायचा नाहीं. फैयाजखांची सारंगी तुम्हाला ऐकायची असेल तर आता चंद्राबाईच्याच रेडिओवर ऐकायला हवी. "

नागेशराव दारांत उभा राहिला आणि पुटपुटला, " या बाटलीचं काय करूं ? "

जानकीबाई म्हणाल्या, " दुकानदार पैसे परत देतो कां बधा कीं. "

" हं. " असं म्हणून नागेश निघून गेला.

जानकीबाई खोलींत परत वळून पाहतात तों वसंतराव आणि बाबी सतरंजीवर बसून "अनमोल घडी" "प्यार की जित" अशी चित्रपटाची नांवं एकमेकांला उखाण्याप्रमाणें सांगून हंसत खिदळत होतीं. जानकी-बाईच्या मनांत आलं, त्यांना म्हणावं कीं खालीं सतरंजीवर बसण्यापेक्षां नीट कोचावर तरी बसा. पण कांहीं न बोलतां त्या मुकाट्यानं सैपाकघरांत गेल्या. सैपाकघरातलं काम आवरतां आवरतां बाहेरच्या खोलींतून वसंतराव आणि बाबी यांचीं अगदी रंगांत आलेली बोलणीं त्यांना ऐकूं येत होतीं.

त्यांच्या मनांत आलं, तीनशे छत्तीस रुपये वायां गेले ! सांपळा लावला, पण जांवई निसटला...

बाकी निसटला तरी कां म्हणायचा ? त्यांच्या मनात लगेच आलं. एक निसटला आणि दुसरा सांपडला असं म्हणायला हवं. तीनशे छत्तीस रुपये देऊन सांपळा आणला होता तो कांहीं वायां गेला नव्हता...आणि आतां तीनशें छत्तीस रुपये द्यावे लागतील असा तरी कुठें संभव होता ? आपल्या सासूपासून कां कुणी रेडिओची भर किंमत वसूल करतं ?...

मनाशीं असे विचार करीत जानकीबाई किती वेळ सैपाकघरांत राहिल्या तें त्यांचं त्यानांच कळलं नाहीं. [ आधारित ]

• • •

## अग्रलेख : ३

लोकल गाडींतून उतरतांना त्यांनीं पाहिलं तों प्लॅटफॉर्मवर कसलीतरी मोठी धमाल उडाली होती. स्टेशन मास्तरच्या ऑफिसपुढं मोठा घोळका जमला होता आणि चारी बाजूंनीं धावतओरडत येणारे लोक त्या घोळक्यांत जाऊन मिसळत होते. काय गडबड आहे म्हणून पाहण्याची त्यांची इच्छा नव्हती. पण गेटाकडे जाण्याचा रस्ताच या गर्दीमुळें अडला असल्यामुळें त्यांना जागच्या जागीं उभं राहणं भागच होतं. घोळक्याच्या सीमेवरच्या लोकातून " मारो, मारो ! बदमाष ! " " छोड दो ! छोडना पडेंगा ! " अशा निरनिराळ्या क्रोधाविष्ट आरोळ्या उठत होत्या, त्यामुळं घोळक्याच्या मधोमध कुणाची कशाबद्दल बाचाबाची चालली होती तें कळणं कठीण होतं. गर्दी हटविणाऱ्या एका शिपायाला त्यांनीं विचारलं तेव्हां त्यांना कळलं, कीं निर्वासितांनीं फराळाच्या दुकानदाराशीं भांडण काढलं होतं आणि त्याला हें दंगलीचं स्वरूप आलं होतं. " रोजचंच आहे हें ! " ते उद्गारले. पोलीस म्हणाला, " हां तर काय ! " त्यांच्या शेजारचा एक इसम आवेशानं म्हणाला, " फार माजले आहेत हे निर्वासित गुंड ! आमचं सरकार झोप काढतंय् कीं काय ? " शिपायानं तें न ऐकल्या-सारखं केलं.

थोड्या वेळानं गर्दी पांगली. तीनचार निर्वासितांना पोलीस घेऊन जाऊं लागले. त्यांच्या मागोमाग जाणारे लोक हलक्या आवाजांत शिव्यांची पुट-पुट करीतच होते. सारी झुंबड गेटांतून बाहेर पडली. आतां थांबून राहण्याचं

कारण नाहीं हें पाहिल्यावर इतका वेळ वर्तमानपत्र वाचीत उभ्या राहिलेल्या त्या गृहस्थांनीं वर्तमानपत्राची घडी केली व झपाझप पावलं टाकून तेहि गेटा-बाहेर पडले व रस्त्याला लागले.

घरीं पोचल्यावर त्यांनीं बायकोला विचारलं, " कशी आहे तुझी प्रकृति ? "

" ठीक आहे. " तिनं हंसून उत्तर दिलं.

" आज जावं लागेलसं वाटतंय का ? "

" बहुतेक नाहीं. पण त्याचा काय नेम ? वेळ सांगून थोडीच येणार आहे ? "

" हो तेंहि खरंच. " ते म्हणाले. पण त्यांच्या मनांत आलं, वेळ आली तरी फिकीर नाहीं. मॅटर्निटीहोममध्यें खोली राखून ठेवली आहे, सारी व्यवस्था केलेली आहे. हिनं केव्हांहि चला म्हटलं की टॅक्सी करायची किंवा मॅटर्निटी होमची अॅंब्युलन्सगाडी मागवायची आणि जायचं. त्यांत काय मोठंसं ?

ते आपल्या खोलींत गेले व कपडे काढून आपल्या टेबलाजवळ बसले. संध्याकाळीं पुन्हा कचेरींत गेल्यावर उद्याच्या अंकासाठीं लिहाव्या लाग-णाऱ्या अग्रलेखाचा विचार ते करूं लागले.

" मी आंत येऊं का ? " कुणीसं दार ढकलून विचारलं.

आपल्या मुलाकडे पाहून ते म्हणाले, " ये. "

सुमारें सत्तावीस वर्षांचा झोकबाज पोषाखांतला त्या उंचानिंच सुदृढ बांध्याचा तो तरुण त्यांच्यासमोर येऊन, टेबलाच्या कांठावर पंजे टेकून उभा राहिला व म्हणाला,

" माझं काम आहे... "

" सांग— "

तो तरुण जरासा गोरामोरा झाला व क्षणभर गप्पच राहिला.

ते म्हणाले " सांग ना. "

" मी लग्न करावं म्हणतों—" पाठ करून ठेवलेलीं वाक्यं ऐन वेळीं विसरल्यावर माणूस ज्याप्रमाणं मग एकदम कांहीं तरी, पण पाऊल चुकत तर नाहीं ना अशा शंकेनं अडखळत बोलतो त्याप्रमाणं तो म्हणाला.

" होय ? " त्याचे वडील मनांतलं आश्चर्य छपवून उद्गारले; " फार छान ! तुझ्या आईला आनंद होईल. तिला सांगितलंस का ? "

" तुमची संमति मिळाल्यावर मग सांगणार आहे. "

" संमति आहेच कीं. मिळवता झाला आहेस. मोठा आहेस. तुझं लग्न व्हायलाच हवं आतां. कुठली मुलगी काढली आहेस शोधून ? "

मुलानं झट्कन् ब्राउन पेपरमधें गुंडाळलेला एक फोटो उघडा केला आणि बापापुढं ठेवला. बापानं चष्मा काढून वर चढविला आणि फोटोकडे पाहिलं. फोटोंतल्या तरुणीच्या लावण्यानंच त्यांचं सार लक्ष क्षणभर वेधून घेतलं व त्यांच्या ओठांवर हास्य दिसूं लागलं.

पण दुसऱ्याच क्षणीं तें हास्य ओसरलं व त्या फोटोकडे पाहतांना त्यांनीं कपाळाला आठी घातली.

" ही मुलगी तूं पसंत केलीस ? "

मुलानं मान हालविली.

" हिच्यावर तुझं प्रेम आहे ? "

" होय. "

" आणि तिचं तुझ्यावर ? "

" फार आहे. "

" अस्सं ! हिचं नांव काय ? "

मुलानं नांव सांगितलं.

" निर्वासितांपैकीं आहे वाटतं ?— "

" होय. "

" लाज नाहीं वाटत तुला ? "

" लाज कशाबद्दल वाटावी मला ? तिच्यावर माझं प्रेम जडलं अन् तिच्याशीं लग्न करायचं मीं म्हटलं तर काय गुन्हा झाला ? "

खरंच, काय गुन्हा झाला असं संपादकाच्या विवेकबुद्धीनंहि विचारलं. म्हणून ते क्षणभर गप्प राहिले. पण मग ते उसळून म्हणाले, " आपल्या जातींतल्या साऱ्या मुली मेल्या होत्या होय म्हणून ही परदेशी मैना तुला आवडली ? हे सारे निर्वासित बदमाष आहेत, चोर आहेत. कुठं भेटली ही पोरटी तुला ? "

तरुणानं सारी हकीगत शांतपणान सांगितली. व शेवटीं तो म्हणाला, " ती आज दारिद्र्याशीं, संकटाशीं झगडते आहे. पण ती मूळची खानदानी कुळांतली आहे. "

" हं ! झूट आहे सारं. हे सगळेच निर्वासित थापा मारतात आपण मोठ्या घराण्यांतले आहोंत म्हणून. कारण त्याना माहीत आहे खरंखोटं कोण बघणार अन् कसं बघणार. "

" खानदानीपणाचं सोंग आणता येत नाहीं. माणसाशीं घटकाभर बोललं कीं लगेच ओळखता येतं खरखोटं. मी तिला तुमच्या अन् आईच्या भेटीला आणतों. तुम्ही—"

" मला तिचं तोंड पाहायची इच्छा नाहीं. या पोरीला पुढं करून कुणी तरी भामट्यांनीं तुझ्याभोंवतीं जाळ पसरलेलं आहे. तें तुला दिसत नाहीं. हिच्या रूपावर तूं भाळला आहेस. पागल झाला आहेस. "

" नाहीं. तिच्यावर माझं खरं प्रेम आहे. "

" बस कर. एक शब्दहि जास्त बोलू नकोस. या लग्नाला मी संमति देणं शक्य नाहीं. "

" पण तिच्याशीं लग्न करायचा माझा निश्चय आहे. "

त्यांच्या मनात आलं, उठून फाड्कन् कानशिलांत भडकवावी पोराच्या. पण त्यांनीं आपला संताप आवरून धरला. दैनिक " प्रकाश " चे संपादक आपल्या चिरंजिवाला चोप देत आहेत असा देखावा त्यांच्या प्रतिष्ठेला शोभण्यासारखा नव्हता. शक्य तेवढ्या शांत पण कठोर स्वरांत ते म्हणाले,

" माझ्या दृष्टीसमोर उभा राहूं नकोस ! जा ! चालता हो. आणि या प्रेमाच्या रोगांतून पूर्ण बरा झालास- तरच या घरांत पुन्हां पाऊल टाक,

तरुणानं कपाळाला आठी घातली. खूप बोलायला प्रारंभ करतांना माणूस आविर्भाव करतं त्याप्रमाणं करून त्यानं तोंड उघडलं. पण ओठापर्यंत आलेले शब्द त्यानं परतविले. तो वळला आणि दाराकडे जाऊं लागला. पावलं टाकतांना त्याची मान लज्जेन किंवा निराशेनं खालीं झाली नव्हती, ताठ होती. त्याच्या गतींत व नजरेंत करार होता.

" हा फोटो घे तुझा ! " वडील ओरडले. त्यांनीं त्याच्या अंगावर फोटो भिरकावला तो त्याच्या पायाशीं पडला,

त्यानं तो प्रेमभरानं उचलला. दार उघडतांना फळीवर हात ठेवून त्यानं वळून बापाकडे पाहिलं व म्हटल,

" तुमच्या आज्ञेप्रमाणं मी जातों. पण जाण्यापूर्वीं तुम्हांला सांगितल्यावांचून राहवत नाहीं कीं समजूतदार माणसासारखं वागणं नाहीं हे तुमचं. तुम्ही मोठा अन्याय करतांहा. माझ्यावरच नव्हे, तर जिच्यावर माझं प्रेम आहे अन् जिच्याशीं मी लग्न करणार तिच्यावरहि. तिच्यावर जास्तच. कारण तिला तुम्ही पाहिलीहि नाहींत, पण वाईट मात्र ठरवलीत. एकदां तिची भेट घ्यायची होतीत तुम्ही आणि ती कशा तऱ्हेची—"

"पुरे पुरे !" वडील ओरडले, " मला नको शहाणपणा शिकवूंस. म्हणे एकदां तिची भेट घ्यायची होतीत ! मला सांगतोस तूं ? या निर्वासितांच्या बदमाषगिऱ्या, कांगावे, सोदेगिऱ्या मला माहीत आहेत. त्यांच्या पोरींचे उद्योगहि मला ऐकून पुष्कळ ठाऊक आहेत. मी तुला पुन्हा एकदां बजावतों बघ, कीं कुणीतरी भामटे तुला या पोरीचं आमिष दाखवून बनवताहेत. डोळे उघडायचे असतील तर उघड, नाहींतर चालता हो माझ्या घरांतून. जर पुन्हा का—"

पण तेवढ्यांत तो तरुण दाराबाहेर गेला होता, त्यामुळं त्यांना पुढचे शब्द उच्चारण्याची गरजच उरली नाहीं.

ते कांहीं वेळ स्वस्थ बसले. त्यांना एकदां वाटलं, जो प्रकार झाला तो बायकोला जाऊन सांगावा. पण लगेच त्यांनीं विचार केला, सध्यांच्या तिच्या स्थितींत तिच्या मनाची स्वस्थता बिघडविणं योग्य नव्हतं. सांगतां येईल तिला सावकाश केव्हांतरी.

त्यांनीं ऑफिसमधें टेलिफोन केला आणि उद्यांच्या अग्रलेखाची कॉपी घेऊन जाण्यासाठी संध्याकाळीं कुणाला तरी धाडण्याबद्दल एका उपसंपादकाला बजावून सांगितलं. ऑफिसमधे जाण्याची त्यांची इच्छा नव्हती. त्यांना अगदीं थकून गेल्यासारखं वाटत होतं. उद्यांचा अग्रलेख आतां ते घरींच लिहिणार होते...निर्वासित लोकांविषयीं त्यांच्या मनांत सांचलेला सारा संताप व तिटकारा या अग्रलेखांत ते ओकून टाकणार होते.

गेल्या वर्षभरांत एखाद्या वादळी पुराच्या गलिच्छ लोंढ्याप्रमाणं मुंबई शहरांत घुसलेल्या या परदेशी निर्वासितांविषयीं त्यांची अप्रीति अधिकाधिक तीव्र होत गेली होती. प्रारंभीं काय ही या आगंतुक पाहुण्यांची पीडा येवढंच त्यांना वाटलं होतं. मग हळूहळू त्यांच्याबद्दल अविश्वास, संशय आणि राग येऊं लागला होता; आणि आता शेवटीं संतापाची आणि वैराची अढी निर्माण झाली होती. या निर्वासितांचे तांडे प्रथम आले व शहराच्या निरनिराळ्या भागात भटकूं लागले तेव्हां त्यांपैकीं दहावीस इसम त्यांच्या घराच्या अंगणात घुसले होते आणि आम्हांला खायला द्या, राहायला जागा द्या, अशा आरोळ्या ठोकून दंगा करूं लागले होते. विनवणी करण्याची अगर दया भाकण्याची त्यांची भाषा नव्हती. हक्कानं मागितल्याप्रमाणं मागण्याची आणि जें मागितलं तें न मिळाल्यास धमाल उडविण्याची त्यांची वृत्ति दिसली होती. पोलीस बोलावून आणून त्यांना हाकून देण्याची वेळ त्यांनीं आणली होती. निर्वासितांच्या त्या पहिल्या अनुभवानं त्याच्या मनांतली सहानुभूति नाहींशी होऊन रोष मात्र निर्माण झाला होता. आणि त्यानंतर बाजारहाटांत, स्टेशनावर, रस्त्यांतुन, छावण्यांतून, निर्वासितांनीं माजविलेल्या दंगलीच्या हकीगती त्याना वरचेवर ऐकावयास मिळाल्या होत्या. निर्वासितांचीं अपकृत्यं तेवढींच त्यांच्या पाहण्यांत व ऐकण्यांत आलीं होतीं. त्यांची पुंडाई तोडून काढली पाहिजे असा त्यांचा ग्रह झाला होता आणि या ग्रहाला पोषक तेवढ्याच गोष्टींची त्यांचं मन नोंद ठेवूं लागलं होतं. सगळ्या वृत्तपत्रांत निर्वासितांबद्दलच्या तक्रारी येत असत तशा त्यांच्या "प्रकाश" मधेंहि येत; आणि अधूनमधून ते या विषयावर लहानसं स्फुटहि लिहीत. "सरकार करतं आहे तरी कांय?" ते आपल्या लेखांत विचारीत.

" मुंबईच्या नागरिकांवर या तथाकथित निराश्रितांची टोळधाळ पडावी आणि या गुंडांनीं आमचं सुखाचं जीवन उसकटून टाकावं अशीच सरकारची इच्छा आहे काय ?...बेशिस्त, उन्मत्त, दंगेखोर निर्वासितांना योग्य वेळीं लगाम घालण्याचा कणखरपणा सरकारनं दाखविला नाहीं तर या संकटाला किती गंभीर स्वरूप येईल त्याची आम्हांला कल्पनाच करवत नाहीं !..."

• आणि आतां तर हें संकट त्यांच्या स्वतःच्या दाराशीं येऊन ठेपलं होतं ! निर्वासितांच्या छावणींतल्या एका पोरीवर त्यांचा मुलगा भाळला होता व तिच्याशीं लग्न लावायला निघाला होता. " माझं तिच्यावर फार प्रेम आहे. " असं तो पुनःपुन्हा म्हणाला होता, नव्हे ? हं : ! खुळा कुठला ! त्या लबाड पोरीनं जाळं पसरल होत आणि त्यांत हा पागल सांपडला होता...निर्वासितांची टोळधाड त्याच्या स्वतःच्या संसारावर आली होती... आतां हद्द झाली म्हणायची...आता या निर्वासितांची गय करून उपयोगी नाहीं. हातांतलीं सारीं शस्त्रं परजून त्यांच्यावर तुटून पडलं पाहिजे. एकंदर समाजावर कोसळूं पाहणाऱ्या या संकटांतून स्वतःचं घर आणि अशींच इतरांची लक्षावधि घरं वांचविली पाहिजेत. या निर्वासितांवरचं संकट ओळखायला हवं; त्यांच्यावर दया करायला हवी, त्यांच्या साहाय्यासाठीं धांवायला पाहिजे, हें सार खरं. त्याचं वागणं नम्रपणाचं असतं, दया करा असं ते म्हणत असते, तर ती करायला हरकत नव्हती. पण हे बेटे वाटेल तेथें घुसत होते, लोकांच्या सुखसोयीचा वांटा हवा म्हणून दांडगाई करीत होते, लोकानीं सहानुभूति दाखविली नाहीं तर आर्जवं करण्याऐवजीं मारपीट करीत होते ! ही काय संकटग्रस्तांची रीत झाली ? अशा गुंडांना काय म्हणून आसरा द्यायचा ? हाकूनच दिलं पाहिजे या उर्मटांना. लोकमत जागृत केलं पाहिजे. सरकारवर कडक टीका केली पाहिजे. ती केल्याबद्दल तुरुंगांत जायची पाळी आली तरी हरकत नाहीं...उद्यांच्या 'प्रकाश'मधील अग्रलेख असा मुद्देसूद, जळजळीत, मर्मभेदक, विखारी झाला पाहिजे कीं लोकांची आणि सरकारची झोपचं उडायला हवी !...साडेसहा वाजतां

प्रेसमधला माणूस येईल कॉपी न्यायला. तोंपर्यंत अग्रलेख तयार झाला पाहिजे !...

" हे पाहुणे कीं लांडगे ? " असा मथळा अग्रलेखाला द्यायचं त्यांनीं मनाशीं ठरविलं...

तिसऱ्या प्रहरचा चहा होईपर्यंत त्यांनीं आपल्या अग्रलेखाची जुळणी केली, व मग ते लिहावयास बसले. अंत:करणांतली सारी चीड त्यांच्या शब्दाशब्दांत बाहेर पडूं लागली. त्याच्या मनांतला सगळा संताप आणि तिटकारा वाक्यावाक्याचा आकार घेऊन कागदावर उठूं लागला. ते बेभान होऊन लिहीत सुटले. भोवतालच्या जगाचा त्यांना संपूर्ण विसर पडला.

वाऱ्याचा एक भयंकर झपाटा खोलींत शिरला तेव्हा ते दचकून शुद्धी-वर आले. त्यांनीं सभोवार पाहिलं. खोलीच दार पुढं मागं झोके घेऊन धाडधाड वाजत होतं. खिडक्यांचीं तावदानं खुळखुळ्यासारखीं वाजत होतीं. पडदे वावडयांप्रमाणं फडफडत होते. " रविवार तारीख २१ नोव्हेंबर १९४८ " दाखविणारं कॅलेंडर भितीशीं झटापट करीत उलथंपालथं होत होतं...या प्रकाराचा अर्थ त्यांना चटकन् कळेना. भांबावलेली नजर इकडे तिकडे फिरवीत ते स्वत:शीं पुटपुटले, अरेच्या, हें काय ?...इतक्यांत वाऱ्याचा आणखी एक झपाटा आला. पहिल्यापेक्षाहि मोठा. धुळीचा लोट खोलीभर पसरला आणि टेबलावरचे अग्रलेखाचे कागद उडून इकडे तिकडे तरंगून फुलपाखरांप्रमाणं भिंतीला, दाराला, जमिनीवरच्या सतरंजीला चिकटले. मोठ्यांदा आरोळी ठोकून ते खुर्चीवरून ताड्कन् उठले व खिड-कीकडे धावले. पण त्यांनीं लोखंडी हूक काढल्याबरोबर दोन्ही तावदानं वगानं लोटलीं गेलीं, खाड्कन् कट्ट्यावर आपटलीं आणि काचा फुटून खळखळ आवाज झाला. त्यांनीं बाहेर दृष्टि टाकली तों विलक्षणच देखावा त्यांना दिसला. दिशा धुंद झाल्या होत्या. चक्राकार गतीनं वाऱ्याचं थैमान सुरू होतं. धूळ, केर, कागदाचे कपटे, चिंध्या, बारीक दगडसुद्धां दारूकाम सुटल्याप्रमाणें वर फेकले जाऊन गरगर फिरत होते. झाडाच्या फांद्या कडाकड मोडत होत्या. नारळीचीं उंच उंच झाडें पिंगा घालीत होतीं...हें आहे तरी काय ?—त्यांना समजेना. वादळ ?—आजूबाजूच्या घरांतून

किंकाळ्या उठत होत्या. खाली बाजार-रस्त्यांत लोक सैरावैरा धावत होते, आरोळ्या ठोकीत होते...दुसऱ्याच क्षणीं दिवे गेले, सगळीकडे अंधार झाला. ते खिडकीपासून दूर होऊन चाचपडत आपल्या टेबलापाशीं गेले. त्यांनीं काडी ओढली व ऑफिसला टेलिफोन करावा म्हणून नंबराचे आकडे फिरविले. "हलो ! हलो !" ते ओरडले. फोन बंद पडला होता. वादळानं तारा तुटल्या असाव्यात. बाहेरच्या जगाशीं त्याचा आतां कांही संबंध उरला नव्हता. त्यानीं फोन तसाच टाकून दिला व घोंगावणाऱ्या तुफान वाऱ्याचा आवाज ऐकत ते जागच्याजागीं उभे राहिले !

त्यांना एकदम आपल्या बायकोची आठवण झाली. कुठं होती ती ? ते लिहीत बसले होते तेव्हां ती बाहेर तर गेली नव्हती ? गेली असली म्हणजे भागलंच ! ते एकदम मधलं दालन ओलांडून गेले व तिच्या खोलींत शिरले. पलंगावर ती होती ! त्यांचा जीव खाली पडला. पण तिच्याजवळ जाऊन पाहिल्याबरोबर त्यांच्या छातींत धस्स झालं. ती कण्हत होती, विवळत होती. तिची चर्या वेदनांनीं व्याकुळ झाल्यासारखी दिसत होती. ते खाली वाकले आणि त्याच क्षणीं तिच्या विव्हळण्याचं कारण लक्षांत आल्यामुळं त्याच्या हृदयाचं पाणीपाणी झालं. या पागल जगात प्रवेश करण्यासाठीं तिच्या अपत्यानं ही घटका निवडली होती ! तिनं त्याचा हात घट्ट पकडला आणि त्याच्याकडे पाहिलं. तिच्या तोंडांतून शब्दाऐवजीं चमत्कारिक आर्त स्वर बाहेर पडला. तिला काय म्हणायचं होतं तें त्याच्या लक्षांत आलं. या प्रसंगीं आपण स्वतः कांहीं करूं शकत नाहीं याची त्यांना मनस्वी शरम वाटली. भीतीचे शहारे त्यांच्या अंगावर उभे राहिले. ते धावत दाराशीं गेले व मोलकरणीला हाका मारूं लागले. पण मग त्यांच्या लक्षांत आलं की मोलकरीण घरांत असण्याची ही वेळ नव्हती.. त्यांनीं पुन्हा अंथरुणावर तडफडणाऱ्या आपल्या बायकोकडे नजर टाकली. त्यांच्या घशांत आवंढा उभा राहिला. प्रसूतिवेदनांनीं हैराण झालेल्या आपल्या पत्नीला साहाय्य करण्याचं किंचित्‌हि सामर्थ्य त्याच्या ठिकाणीं नव्हतं. ती असाहाय्य अवस्थेत पडली होती. ते स्वतः तिच्याहूनहि अधिक दुबळे होते...बाहेर वादळी वारा वाजत होता. आतां पावसाचाहि आवाज ऐकूं

येत होता.. पंचमहाभूतांचा प्रळय कधीं संपणार नाहीं असा भास त्यांना झाला...

ते परत पलंगाजवळ गेले. बायकोच्या अंगावरून हात फिरवीत मुक्या जनावराप्रमाणे बसून राहिले. त्यानीं तिचं हलकेच चुंबन घेतलं. त्यांच्या कानांत ती म्हणाली, "मला ताबडतोब मॅटर्निटी होमकडे गेलं पाहिजे. "होय, होय." ते पुटपुटले; पण त्यांच्या मनात आलं, हें कसं शक्य आहे ! हिला न्यायची कशी ? बाहेर हा प्रळय चालू असताना न्यायची कशी ! टॅक्सी मिळणं सर्वस्वी अशक्य होतं. मॅटर्निटि होमची ॲब्युलन्स गाडी मागवितां येण्यासारखी होती. पण त्यांना निरोप द्यायचा कसा ? फोन बंद पडला होता ! हिला न्यायची कशी ?...आणि ही तर प्राणांतिक वेदनांनी हैराण होऊन तळमळते आहे !...वा रे प्रसग ! अशी भयंकर घटका कधीं कुणाच्या वाट्याला आली नसेल ! सारं सामर्थ्य, सारी आशा, सारा आधार तुटल्यावर जी असाहायता वाटते तिचा प्रत्यय त्यांना त्या क्षणीं उत्कटतेनं आला ! आणि अशा असहायतेतून जो आततायी अविवेक निर्माण होतो तोहि त्यांच्या मनात त्या क्षणी उद्‌भवला !...

ते एकदम पलंगापासून दूर झाले व त्यांनीं खोलीबाहेर, जिन्याच्या पायऱ्यावरून, घरापुढच्या अंगणांतून धूम ठोकली. वाऱ्याच्या व पावसाच्या थैमानाला न जुमानतां ते रस्त्यानं चालूं लागले. रस्त्यावर उजेड नव्हता, माणूस नव्हतं. पण चाचपडत, ठेचकाळत, वाऱ्याच्या माराबरोबर झुकांड्या घेत, पाण्याचीं डबकीं तुडवीत ते जात होते. एका टॅक्सीवाल्याचा तबेला त्यांना माहीत होता, त्याच्या दिशेनं ते चालले होते. तिथं गेल्यावर त्यांनीं टॅक्सीवाल्यापाशीं आपल्या संकटाचं वर्णन केलं आणि मदतीची याचना केली. पण टॅक्सीवाला गाडी बाहेर काढायला कबूल होईना.

"पैशाचा प्रश्न नाहीं; वाटेल तेवढे पैसे घे. पण चल," त्यांनीं विनवणी केली. पन्नास, शंभर, वेळच आली तर दोनशे रुपयेदेखील फेकायला ते तयार होते.

पण टॅक्सीवाला होय म्हणेना. “ कुणी हजार रुपये देतो म्हटलं तरी या वादळांत गाडी काढणार नाहीं आपण ! ” त्यानं सांगितलं.

“ असं उत्तर द्यायला तुला कांहीं वाटत नाहीं ? ” ते त्या टॅक्सीवाल्यावर ओरडले. आपल्या असहायतेची व संकटाची त्यानं, दखल घेऊं नये याचा त्यांना विलक्षण संताप आला. “ मला मदत करणार नाहीस तूं ! माझी दया येत नाहीं तुला. तुला सांगितलं ना मी कीं माझी बायको बाळंत होणार आहे–”

“ हा काय माझा अपराध आहे साहेब ? ” असं म्हणून टॅक्सीवाला हसूं लागला.

ती दुष्ट थट्टा आणि उपहासानं भरलेलं ते हसणं ऐकतांच त्यांच्या डोक्यांत तिडीक उठली. गाडीच्या फुटबोर्डावर पडलेला लोखंडी दांडा त्यानी झट्कन् उचलला, व टॅक्सीवाल्याच्या डोक्यात घातला.. टॅक्सीवाला धाडकन आडवा पडला. त्यानीं त्याचे खिसे भराभर तपासले. गाडीची किल्ली त्याना सांपडली...

रस्त्यावरचं खळाळणारं पाणी कापीत गाडी चालवितांना ते मनाशीं म्हणत होते, परमेश्वर मदतीला धावून आला म्हणायचा. आतां बायकोला मॅटर्निटी होममध्यें पोचाविणं शक्य होतं...तबेल्यात घडलेल्या प्रकाराची त्याना पुनः पुन्हा आठवण येत होती. पण आपण कांहीं वावगं केलं असा पश्चात्ताप त्यांना वाटत नव्हता. त्यांच्या असाहायतेची त्या टॅक्सीवाल्यानं उपेक्षा आणि थट्टा केली नसती तर कशाला त्यांनीं अत्याचार केला असता ?... तो मेला नसेल, फक्त मूर्छा येऊन पडला असेल. येईल कांहीं वेळानं शुद्धीवर. त्यांची सदसद्विवेकबुद्धि त्यांना टोचीत नव्हती. त्यांची अगतिकता व गरज टॅक्सीवाल्यानं ओळखायला हवी होती. ती त्यानं ओळखली नाहीं म्हणून त्यांनीं मवालीपणा केला होता. त्यांत काय चुकलं होतं ! कांहीं नाहीं...

घरीं गेल्यावर त्यांनीं बायकोला टॅक्सींत घातलं. सेफ उघडून तिथं होत्या तेवढ्या साऱ्या नोटा त्यांनीं खिशांत कोंबल्या. शक्य तितके रोख पैसे जवळ असलेले बरे, त्यांनीं विचार केला. केव्हां किती पैशांची गरज

लागेल, नियम नव्हता. मॅटर्निटी होममधल्या लोकांनीं त्याचं सारं धन मागितलं तरी तें त्यांच्या अंगावर फेकायची त्यांची तयारी होती...बायकोला घेऊन मॅटर्निटी होमच्या रस्त्यानं जपून पण शक्य तितक्या वेगानं गाडी हाकतांना ते परमेश्वराची एकच प्रार्थना करीत होते. या झंझावातात गाडी उडून जाऊं देऊं नकोस...मॅटर्निटी होमवर एकदा पोचल्यावर मग कसली चिंता उरणार नव्हती. सारं ठीक होणार होतं. डॉक्टर मागेल तेवढी फी ते देणार होते. खिशातल्या त्या साऱ्या नोटा द्याव्या लागल्या तरी त्या काढून डॉक्टरच्या हातांत ते ठेवणार होते...आणि इतकंहि करून डॉक्टर मदत करीत नाहीं म्हणाला तर?—तर काय?

टॅक्सीवाल्याच्या डोक्यात लोखंडी दांडा घातला नव्हता काय त्यांनीं? वेळच आली तर डॉक्टरलाहि गुंडगिरी करून दशहत घालायला ते मागंपुढं पाहणार नव्हते. ते व त्यांची बायको, दोघं संकटांत सापडलीं होती. लोकाच्या सहानुभूतीचा, दयेचा, मदतीचा आसरा शोधीत होती. जगान त्याना धीर दिला पाहिजे, आधार दिला पाहिजे. त्यांवर त्याचा हक्क खचित होता. हक्काची दया जगानं खुषीनं दाखविली तर ठीक, नाहीं दाखविली तर दशहत घालून धाक दाखवून, अत्याचार करून लोकाची मदत घेणं रास्तच नव्हत काय?...

त्याच्या मनात एकाएकीं आलं की ज्या परदेशी निर्वासिताबद्दल संतापाची व तिटकाऱ्याची अढी त्यांनीं मनांत वागविली होती, त्याच्याप्रमाणच– अगदीं त्यांच्याप्रमाणंच ते वागत होते व विचार करीत होते!...आजपर्यंत त्यांनीं त्या निर्वासितांकडे फक्त दुरून पाहिलं होतं. त्यांच्या दुर्दैवाचा, दुःखाचा, संकटाचा, निराधार अवस्थेचा आणि त्या अवस्थेच्या पोटीं उद्भवणाऱ्या आततायीपणाचा त्यांच्या अंतरंगांत शिरून, त्यांच्या भूमिकेवरून त्यांनीं कधीं विचार केला नव्हता... पण या घटकेला मात्र सर्वस्वी आधारशून्य होणं म्हणजे काय, निर्वासित होणं म्हणजे काय, लोकाच्या साहाय्यावाचून जगण्याची आशा नसणं, तें साहाय्य मिळालंच पाहिजे असं वाटणं आणि तें मिळालं नाहींतर माथेफिरूपणा करावासा वाटणं म्हणजे काय त्याचा अगदीं उत्कट अनुभव त्यांना आला होता!... ते स्वतः एक प्रकारें निर्वासितच झाले होते...

बुधवार ता. २४ नोव्हेंबरच्या ' प्रकाश 'च्या अंकांत निर्वासितांच्या प्रश्नावर जो पांच कॉलमी अग्रलेख प्रसिद्ध झाला, त्याचा जिकडेतिकडे बोलबाला झाला. इतका सुंदर अग्रलेख कित्येक वर्षांत वृत्तपत्रांत वाचायला मिळाला नव्हता असं जो तो म्हणू लागला. या अग्रलेखाचा मथळा " पाहुणे की लांडगे ? " असा नव्हता; " आपले अभागी भाई ! " असा होता !



# पार्वती : ४

चरायला सोडलेल्या गुरांच्या मागोमाग डोंगराच्या चढणीवरून जातां जातां पार्वती एकदम थाबली. एका झुडपात छापील कागदाचा एक तुकडा फडफडलेला तिला दिसला होता. हातातली काठी सरसावीत ती चार सहा पावलं पुढें गेली. झुडपाच्या काटेरी फांद्या काठीन तिनं दूर केल्या व कागदाचा कपटा अलगद काढून घेतला. जुन्या वर्तमानपत्राचा तो तुकडा कुठून तरी वाऱ्यावर उडत उडत रानांतल्या या जागीं आला असावा. पाऊसपाण्यानं भिजून आणि उन्हात तापून त्याचा रंग काळा पिवळा झाला होता, आणि त्यावर काळसर ओघळ उठले होते. पण जणूं एखादी मोलाची वस्तु अचानक हातीं आल्याप्रमाणें पार्वतीन तो उचलून घेतला आणि झपाट्यानं अंधुक होत चाललेल्या संध्याकाळच्या प्रकाशांत त्यावरील मजकूर वाचण्यासाठीं हातांतली काठी टाकून देऊन पार्वती एका दगडावर बसली. मजकूर वाचण्यासाठीं असं म्हणण्यापेक्षा त्या कागदावर छापलेल्या अक्षरांपैकीं ओळखतां येतील तेवढीं अक्षरं ओळखण्यासाठीं पार्वती बसली होती असं म्हणणच अधिक बरोबर होईल. कारण टट पप करीत अक्षरं ओळखण्यापर्यन्तच तिची मजल गेली होती. मात्र त्या गोष्टीचा तिला विलक्षण छंद लागलेला होता. लहान मोठा छापील कागदाचा तुकडा रानांत, रस्त्यावर, चावडीपुढें, देवळाजवळ, वाण्याकडून आणलेल्या पुरचुंडींत सांपडला रे सांपडला कीं ती आधाशीपणानं हातीं घेई, आणि त्यांतलीं लागतील तितकीं अक्षरं लावल्यावांचून तिला चैन पडत नसे. ती

दगडावर बसली व आपला प्रयोग तिनं सुरू केला. गुरं रेंगाळूं लागलीं तिकडे तिनं लक्ष दिलं नाहीं.

रोज तिच्याबरोबर राखणीला येणाऱ्या तिच्या वयाच्याच महादूनं ओरडून म्हटलं, " ए पारे, नीट वखताला गुरूं पोचवायची हैती कां न्हाई तुला ? "

" आल्यें आल्यें. तूं हो म्होरं. " पार्वतीनं मान वर न करतां ओरडून सांगितलं. दिसेनासं होण्यापूर्वी हातांतल्या त्या तुकड्यावरचीं सगळीं अक्षरं ओळखण्याची तिची फार इच्छा होती.

महादू मनाशीं म्हणाला, " ही पारी एखाद्या खुळ्यावानीच करायला लागलीय् आताशा. " त्यानं थुंकीची पिचकारी टाकली, आणि तो जागच्या जागीं थांबून पार्वतीकडे पहात राहिला.

महादूचा विचार कांहीं खोटा नव्हता. त्यानं तिला खुळी ठरवावी असंच ती आतांशा करूं लागली होती. त्याला स्वतःला लिहितां वाचतां येत नव्हतं. त्या लहानशा खेडेगांवांतल्या रयतापैकीं कुणालाच येत नव्हतं. कागदांचे जुने कपटे हातांत धरून घटका दोन घटका त्याकडं बघत बसायचं म्हणजे त्यांच्या दृष्टीनें खुळेपणाच होता. स्वतः पार्वतीनं सुद्धां एक महिन्यापूर्वीं या गोष्टीला खुळेपणाच म्हटलं असतं. पण ती आतां पूर्वींची पार्वती राहिली नव्हती. तिच्यांत फार मोठा बदल झाला होता. छापील कागदाचा उपयोग काय, तर चहा, साखऱ्या अशा वस्तू त्यांत बांधतां येतात असं उत्तर पार्वतीनं पूर्वीं दिलं असतं; पण आता छापील कागदाचा दुसरा उपयोग तिला माहीत झाला होता. त्यावर जी अक्षरं छापलेलीं असतात तीं ओळखण्यांत गंमत असते हें तिला ठाऊक होतं. कधीं कधीं दहावीस अक्षरं ओळींत वाचली कीं त्यांतून कांहीं तरी अर्थ आपल्या मनापर्यंत पोंचतो आणि तो पोहोंचला कीं, विलक्षण आनंद होतो असाहि अनुभव मधून मधून तिला आला होता.

सुमारें एक महिन्यापूर्वीं इनामदारांची थोरली लेक माघारपणाला आली होती, तिच्या तान्ह्या मुलाला संभाळायला म्हणून पार्वती राहिली होती. रात्रंदिवस ती त्यांच्याच घरीं असे. इनामदारांची मुलगी कुसुमताई तिला एकदां म्हणाली होती, " पारे, तूं पुष्कळदां उगीच गप्प बसलेली असतेस.

तुझा वेळ वायां जातो, मी तुला लिहायला वाचायला शिकविते. शिकशील का ? " पार्वती म्हणाली होती, " माझा बा कधीं शिकला न्हाई, अन् मी शिकूं म्हणता ? मला बाई माणसाला काय करायचं हाये शिकूनशान् !" पण कुसुमताईनं साक्षरतेच्या महत्त्वावर तिला एक लहानसं व्याख्यान दिलं होतं, आणि आग्रह करून तिला शिकायला भाग पाडलं होतं. महिनाभरांत पार्वती बालबोध पहिलं पुस्तक वाचूं लागली होती. ती जात्याच फार हुषार होती. तिला आणखी शिकवावं अशी कुसुमताईची फार इच्छा होती. पण नवऱ्याची तार आल्यामुळें तिला आपला माहेरचा मुक्काम संपवून परत सासरीं जाणं भाग पडलं होतं, आणि पार्वतीचं शिक्षण सपलं होतं. कुसुमताईनं जाताना तिला बजावलं होतं, " पारे, तुला आतां अक्षर ओळख चांगली झाली आहे. तुला हीं दोन पुस्तकं मी देतें ती वाच. पुनः पुनः वाच. शिवाय कुठें कांहीं छापलेलें दिसलें कीं वाचायची धडपड करीत जा. कळो न कळो वाचीत जा. वाचूं लागलीस कीं हळूं हळूं कळूं लागेल." त्याप्रमाणें वागायच पार्वतीनं आनंदानं कबूल केलं होतं. एका कुळवाड्याच्या मुलीला साक्षर करून आपण माणसांत आणून सोडलं आणि आयुष्याच्या सार्थकतेचा मार्ग तिला दाखविला या कल्पनेच्या आनंदांत कुसुमताई त्या गांवच्या गांवाहून परत गेली होती. आयुष्याचं सार्थक वगैरे कल्पनांचा वास देखील पार्वतीला असणं शक्य नव्हतं. परतु एक नवीन आनंद आपल्या हातीं आला येवढं तिला कळत होतं. कुसुमताईनं दिलेलीं पुस्तकं पुनः पुन्हां वाचण्याचा क्रम तर तिनं ठेवलाच, पण शिवाय सांपडेल तिथें मिळेल तो छापील कागद उचलायचा आणि घरीं आणायचा तिनं सपाटा चालू केला होता. हे जमविलेले सारे छापील कागद तिनं मोठ्या काळजीपूर्वक एका फडक्यांत बांधून ठेवले होते.

तिचा म्हातारा बाप रामजी यानं कांहीं दिवस तिचं कौतुक केलं, इनामदारांच्या ताईनीं आपल्या पोरीला एक पुस्तक शिकवलं या गोष्टीची त्याला मोठी धन्यता वाटली. पण पुढें जेव्हां पार्वतीनं कागद गोळा करून संग्रहीं ठेवण्याचा उद्योग सुरूं केला तेव्हां तिचं तें करणं त्याला अगदीं खुळेपणाचं वाटूं लागलं. कुळवाड्याच्या मुलीला लिहिण्यावाचण्याशीं करायचंय काय ? बापानं

लग्न करून दिलं कीं संसाराच्या वाटेला लागायचं, आणखी आया, आज्या, ज्या गोष्टी करीत आल्या त्या करीत मरेपर्यंत ती वाट चालायची, या पलीकडे पार्वतीसारख्या मुलीला दुसरं कांही जिणं असूं शकतं काय ? खुळी कुठली ! एक दोनदा त्यानं पार्वतीला हा वेदान्त सांगून पाहिला. पण तिचं वाचण्याचं वेड ती कांहीं सोडीना. तेव्हा त्यानं मनाशीं विचार केला कीं तिच्यावर रागावण्यांत कांहीं अर्थ नाहीं. चालूं दे हिचा खुळा छंद. किती दिवस चालेल ? लगीन होऊन आपल्या नवऱ्याच्या घरीं गेली आणि नांदूं लागली कीं आपोआप संपेल हें सारं ! आणि तें व्हायला आतां फार अवकाश होता काय ? तिच्यासाठीं त्यानं नवरा बघून ठेवला होता. येत्या मार्गेसरांत तिला हळद लागायची हें ठरलेलं होतं.

रामजीच्या योजनेप्रमाणे पार्वतीचं लग्न झालं आणि लखू सांवताच्या घरांत त्याची सून म्हणून ती नांदायला गेली. पण रामजीचा साराच हिशेब कांहीं खरा ठरला नाहीं. घर–काम, शेतकाम सांभाळूनसुद्धां पार्वतीनें आपला वाचण्याचा उद्योग चालूच ठेविला. तिचा नवरा शिवराम म्हणजे सामान्य अडाणी शेतकऱ्याचा नमुना होता. लिहिणं वाचणं त्याला जन्मांत माहीत नव्हतं. रात्रीं राकेलच्या डबड्याच्या उजेडात पार्वती वाचीत बसलेली त्याला दिसली कीं तो मनाशीं म्हणे, " हिचं काय डोकं बिकं बिघडलंय् काय ? " पण घरकाम चोख करून पार्वतीनं ज्याप्रमाणे आपल्या सासूसासऱ्यांना तक्रार करायला जागा ठेवली नव्हती, त्याप्रमाणें ती पत्नीधर्मही उत्तमप्रकारें पाळीत असे, आणि त्यामुळें शिवराम मनाशीं म्हणे, " मरेना का वाचीना. " तिच्या वाचण्याच्या मूर्ख नादाकडे दुर्लक्ष करणं त्याला अवघड वाटत नसे.

एकदां त्यानं मोठ्या प्रेमानें पार्वतीला विचारलं, " तुला लहानसा दागिना करून घालायची माझी इच्छा आहे. तुला काय आवडेल ? सांग. उद्यां बैलगाडी घेऊन मी जाणार आहे शहराला. काय घेऊन येऊं तुझ्यासाठीं ? सांग. "

पार्वती म्हणाली, " मला काय हवं खरं सांगूं ? आणाल तुम्ही ? "

" वा ! तूं माझी लाडकी पारू नाहींस काय ? तूं सांगशील तें आणीन. "

" माझ्यासाठीं एक चांगलंसं पुस्तक घेऊन या. "

शिवराम मोठमोठ्यानं हंसूं लागला. तो म्हणाला, " पुस्तक हवं तुला ? कशी वेडी ग तूं. ते काय तूं नाकांत घालणार कीं कानांत घालणार कीं डोक्यांत ? " .

पार्वतीनं गंभीरपणानं त्याच्याकडे पाहिलं व म्हटलं, " तुम्ही आणा म्हणजे झालं. " शिवराम म्हणाला, " आणतों. दागिनाबी आणतो. अन् तुला आवडेल असं छानपैकीं पुस्तकबी आणतो. "

बायकोसाठीं पुस्तक आणायच्या हेतूनें शिवराम घरून निघाला खरा, परंतु त्याबद्दल तो अधिक विचार करूं लागला तेव्हां त्याच्या लक्षात येऊं लागलं कीं जी गोष्ट करायचं त्यानें मनाशीं ठरविलं होतं ती कांहीं सोपी नव्हती. त्यानं जन्मांत कधीं पुस्तक विकत घेतलेलं नव्हतं. चांगलंसं पुस्तक कशाला म्हणतात याची त्याला कल्पना नव्हती. शहरांत पुस्तकाचं दुकान त्यानं पाहिलं होतं. पण तिथं आपण गेलों तर चांगलंसं पुस्तक दुकानदार देईल याची काय खात्री होती ? एकदां त्यानं शहरातल्या एका दुकानांत जाऊन चांगलासा अडकित्ता मागितला होता अन् दुकानदारानं आणा-शपथा घेऊन उत्तम पात्याचा म्हणून दिला तो त्यानं खरेदी केला होता. पण महिनाभरांत त्या अडकित्त्यांत बोटाचं पेरदेखील सांपडलं तरी दुखायचं नाहीं अशी त्याची अवस्था झाली होती, अन् सारे लोक त्याला हंसूं लागले होते. तसंच आतां या पुस्तकाच्या बाबतींत झालं म्हणजे ? चांगल्या मिठाईचीं, वाईट मिठाईचीं वेगवेगळीं दुकानें असतात त्याप्रमाणें पुस्तकांचीही असलीं पाहिजेत. खात्रीलायक चांगला माल जिथें मिळतो, लहान पोर गेलं तरी जिथें चांगलंच पुस्तक दिलं जातं असं एखादं शेलकं पुस्तकांचं दुकान शहरांतल्या बाजारपेठेंत असलंच पाहिजे...पण तें आपल्याला सांपडायचं कसं ?...बरं या बाबतींत विचारायचं कुणाला ?...बैलगाडी तीन मैल गेली तरी या अडचणींतून वाट कशी काढायची तें कांहीं शिवरामला सुचेना.

पण मग एकदम त्याला युक्ति सुचली. गोखले मास्तरांची त्याला आठवण झाली. दादा गोखले कुठल्या शाळेंत मास्तर होते तें त्याला माहीत नव्हतं. पण त्यांची थोडी शेती शिवरामच्या गांवाच्या आसपास होती.

त्यामुळें ते कधीं कधीं त्या बाजूला येत, आणि ते आले कीं जो तो त्यांना गोखले मास्तर म्हणत असे—येवढ शिवरामला माहीत होतं. त्यांची आठवण होतांच शिवराम मनाशीं म्हणाला, " हां रे हां, गोखले मास्तरना विचारावं म्हणजे ते बराबर सागतील आपल्याला कुठल्या दुकानात, कुठलं पुस्तक घ्यायचं तें. " या विचारानं शिवरामला हायसं वाटलं आणि चाबूक उगारून व हातांतला कासरा ढिला सोडून त्यानं आपल्या आवडत्या बैलाना जरा जलदी करण्याचा इषारा दिला. शहरात गेल्यावर शिवरामनं प्रथम गोखले मास्तरांचं घर गांठलं, आणि त्यांची गाठ पडल्यावर आपण कोणत्या बाबतींत त्यांचा सल्ला घ्यावयास आलों तें त्याना निवेदन केलं.

ते त्याची हकीगत ऐकून चकीत झाले आणि खूषहि झाले. ते म्हणाले, " शिवराम, अरे, अशी बायको मिळाल्याबद्दल तुला मोठा अभिमान वाटला पाहिजे रे ! " शिवराम त्यांच्याकडे बघत राहिला. त्याला पार्वतीचा अभिमान वाटत नव्हता असं थोडच होतं ? ती घरकाम उत्तम प्रकारें करीत होती, सासू सासऱ्यांची सेवा करीत होती, या सर्व गोष्टीमुळें कोणत्याही नवऱ्याला बायको आवडावी तितकी ती त्याला आवडत होती, आणि तितक्यापुरता तिचा त्याला अभिमानही वाटत होता. परतु यापलीकडं कसला अभिमान धरायचा तें त्याला कळत नव्हतें. पुस्तक वाचण्याची पार्वतीची हौस त्याला फक्त एका चमत्कारिक लहरीसारखी वाटत होती. तिच्यावर त्याची ममता होती म्हणूनच केवळ त्या चमत्कारिक लहरीचं कौतुक करायला तो तयार झाला होता...मनांतले हे विचार बोलून दाखविण्याची शिवरामला अक्कल नव्हती. पण ते त्याच्या मनांत आले, आणि एखाद्या निर्बुद्ध जनावराप्रमाणें तो मास्तरांकडे पहात राहिला. मास्तर अर्धवट स्वगत म्हणाले,

" आतां तुझी बायको चांगलंसं पुस्तक मागते तेव्हा कोणत पुस्तक द्यावं तिला ? " अनेक पुस्तकांचीं नावं त्यांनीं भराभर आठवून पाहिलीं. परंतु त्यांतलं एकही पुस्तक त्यांच्या मनाला पटेना. त्यांची चर्या जरा त्रासल्यासारखी झाली. कपाळाला आठी घालून ते स्वगत उद्गारले, " कोठलं पुस्तक

द्यावं ? " परंतु तितक्यांत त्यांची कपाळावरची आठी दूर झाली व ते हंसत शिवरामला म्हणाले, " अरे होय रे गड्या. एक पुस्तक आहे. अगदीं तुझ्या बायकोला देण्यासारखं, तें पुस्तक तिनं वाचलं कीं तिला नीति, धर्म, लौकिक आचार फार उत्तम कळूं लागेल. आपले पूर्वज कसे वागत असत त्याचा कित्ता डोळ्यासमोर सदा ठेवायचा असेल तर या पुस्तकासारखं दुसरं पुस्तक नाहीं असं मोठमोठ्या विद्वानांचं मत आहे. हेंच पुस्तक घेऊन ये तूं पार्वतीला, ऐकलंस कां ? जा, हेंच पुस्तक दे. "

शिवराम म्हणाला, " पर मास्तर त्या पुस्तकांचं नाव कुठं सांगितलं तुम्ही ? "

" अरे खरंच कीं ! नाहींच सांगितलं नाही कां ? त्याचं नांव महाभारतांतील कथा. "

" पार्वतीनं चांगलंसं पुस्तक घेऊन या म्हणून सांगितलंया. तुम्ही म्हणतां तें पुस्तक अगदीं चांगलंसं हाये ना ? "

" अरे, चांगलंसं म्हणून काय विचारतोस ? तुझ्या बायकोच्या हातीं द्यायला यासारखं दुसरं पुस्तक नाहीं बघ. जा त्या बाजारपेठेंतल्या मोठ्या दुकानांत आणि हें पुस्तक माग. "

" दुकानदार नेमकं देईल ना ? मला फसवायचा नाहीं ना ? "

मास्तर हंसले व म्हणाले, " हू जा जा. "

शिवराम तडक दुकानांत गेला व त्यानें मास्तरांनीं सांगितलेलं पुस्तक विकत घेतलें. पुस्तकाच्या जाड पुठ्ठयावरचं रंगीत चित्र पाहिल्यावर त्याच्या चांगुलपणाबद्दल त्याची पुरती खात्री पटली. पीतांबर कसलेला उघड्या अंगाचा अर्जुन धनुष्याला बाण लावून मत्स्यवेध करीत असल्याचं चित्र होतं तें. इतकं सुंदर चित्र ज्या पुस्तकावर होतं तें चांगलंच पुस्तक असणार याबद्दल संशयाला जागा कुठली ! शिवरामनं मनांतल्या मनांत मास्तरांचे फार आभार मानले आणि पार्वतीला हें पुस्तक फार आवडणार या कल्पनेच्या आनंदांत स्वारीनं बैलगाडी गांवाकडं परत काढली.

पार्वतीला तें पुस्तक इतकं आवडलं कीं फुरसतीच्या वेळांत एक क्षण भरही ती तें हातावेगळं करीना. पुस्तक लिहिणाऱ्यानं तें सोप्या सुबोध भाषेंत लिहिलं होतं त्यामुळें ज्यांचा अर्थ तिला माहीत नव्हता अशा शब्दावर क्वचित् स्थळीं जरी ती अडखळे तरी मजकुराचा मुख्य गाभा तिच्या हातीं लागत असे आणि एकंदर कथेचं मर्म तिला सहज कळे. तिनं प्रथम पुस्तक वाचून काढलं तें केवळ एकेका कथेंत काय काय घडलं तें जाणून घेण्याच्या ओढींत. पण मग तिनं पुन्हां त्या पुस्तकाचं वाचन सुरू केलं त्या वेळीं तिचं मन केवळ कथाभागाच्या चमत्कृतींत न रमता प्रत्येक गोष्टींत जें काही सांगितलं होतं त्यावर ती विचार करूं लागली. ज्या काळांतल्या त्या गोष्टी होत्या, त्या काळात समाज अमक्या तऱ्हेचा होता, चालीरीती अमक्या प्रकारच्या होत्या, स्त्रिया पुरुषाशीं अमुक तऱ्हेनं बोलत चालत, पुरुष अमक्या तऱ्हेचे असत व अमक्या तऱ्हेनें वागत इत्यादि कल्पना अस्पष्टपणेंच कां होईना परतु तिच्या मनात उद्‌भवूं लागल्या——आणि स्वतःच्या वांट्याला आलेल्या आयुष्याची, माणसांची व परिस्थितीची त्या पुस्तकांत रंगविलेल्या चित्रांशीं ती मनांतल्या मनांत तुलना करूं लागली. दमयंती, रुक्मिणी, द्रौपदी, सुभद्रा, या स्त्रियांनीं आपापले नवरे स्वतःच्या मतानं शोधून काढले होते. बापानं नवरा ठरवावा व मुलीनं तो पत्करावा असा प्रकार कुणाच्याच बाबतींत झाला नव्हता. रुक्मिणीनं तर मोठं चतुर कारस्थान रचून कृष्णाशीं लग्न लावलं होतं; आणि थोरल्या भावानं ठरविलेलं लग्न मोडून अर्जुनाशीं लग्न करण्याच्या बाबतींत प्रत्यक्ष देवानं सुभद्रेला सहाय्य केलं होतं. स्वयंवराच्या या कथा पार्वती वाचूं लागली कीं त्यांचा तिच्या मनावर फार परिणाम होई. ज्या स्त्रियांच्या हकीगती ती वाचे त्यांनीं मिळवलेल्या सुखाची कल्पना मनात येतांच तिच्या अंगावर रोमांच उभे रहात. त्या स्त्रियांचीं ज्या पुरुषांशीं लग्न झालीं त्यांच्या सौंदर्याचीं वर्णनं कितीदांहि वाचली तरी तिला पुरेशी वाटत नसत. आणि तीं वाचतां वाचतां कधीं कधीं ती एकदम थांबे. पुस्तकांतल्या सृष्टींतून तिचं मन एकदम हेलकावा खाऊन तिच्या स्वत.च्या जीवनसृष्टींत येऊन पडे, आणि तिच्या मनाला मोठाच धक्का बसे. स्वतःच्या लग्नाविषयीं, शिवराम-

विषयीं ती मनांतल्या मनांत भलभलते विचार करूं लागली. शिवराम तिचा नवरा होता म्हणजे काय ? त्याला कुणी पसंत केलं ? तिची आवड निवड तिच्या बापान कधीं विचारांत घेतली ? लखू सावंताला मुलगा होता, आणि रामजीला मुलगी होती. लखूला सून हवी होती, रामजीला जांवई हवा होता, येवढयाच कारणानं तिच शिवरामशीं लग्न झालं होतं ! आणि रामजीची निर्बुद्ध साधीभोळी लेक मुकाट्यानं सावंताच्या घरांत नांदायला आली होती !...असं कां घडावं ? कसं घडतं ? महाभारतांत ज्या गोष्टी सांगितल्या आहेत त्या तर प्रत्यक्षांत घडलेल्या आहेत. इथें आपल्या देशांतच घडलेल्या आहेत ! पुराणाला कीर्तनाला जमणारीं सारीं माणसं त्या आदरानं व भक्तिभावानं ऐकतात. त्या गोष्टी वाईट होत्या असं कोणी म्हणत नाहीं. उलट ज्या स्त्रीपुरुषांच्या त्या गोष्टी आहेत त्यांचीं नांव ऐकल्याबरोबर बायकापुरुष हात जोडून नमस्कार करतात. माणसानी कसं वागावं याबद्दल त्या गोष्टी म्हणजे किती होत असं सारींजणं सांगतात !...

आणि तरी शिवरामशीं लग्न लावून देतांना तिला कुणीच कांहीं विचारलं नव्हतं. लखू सावंताचा जो आडमुठा, काळाबेंदरा, कुरूप शिवराम शेतांत चावडीवर, विहिरीवर पूर्वी शंभर वेळां तिनं पाहिला होता तो एकदम एके दिवशीं तिचा नवरा झाला होता ! आणि तिनंही त्याला आपला नवरा मानला होता ! कांहीं तक्रार केली नव्हती !......

परंतु आतां तिचं मन मोठी तक्रार करूं लागलं. शिवराम आपला नवरा आहे ही गोष्ट मान्य करून त्याप्रमाणें वागताना तिचं मन सारखं ओढ घेऊं लागलं ! वरकरणीं ती पूर्वीप्रमाणेंच मोठ्या आनंदानं घरकाम, शेतकाम उरकून टाकी. पत्नीधर्माचं पालनही ती करी. परंतु या गोष्टी करतांना तिचं मन तक्रार करी, धुसफुसे, ओढ घेई, रडे, रागावे, जळे. अशा वेळीं मनाचं दुःख विसरण्यासाठीं ती अधिकच उत्कंठेने महाभारतांतील कथा वाचीत सुटे. त्या कथांत पुरुषांचीं मनं बायकांवर जडलीं होतीं. "मला तुझ्या सौंदर्यानं मोह घातला आहे, मला तूं हवास." असं बायकांनीं पुरुषांना खुशाल सांगितलं होतं. त्यांनीं लाज धरली नव्हती. त्याबद्दल त्यांना कुणी दोष दिला नव्हता. स्त्रीला पुरुष आवडला पाहिजे हें सर्वांनीं मान्य केलेलें

तत्त्व होतं...असल्या वर्णनांत ती बराच वेळ दंग होऊन राही. पण पुन्हां ती दचकून थांबे. पुस्तक तसंच हातांत धरून ती मनाशीं म्हणे, या पुस्त-कांतल्या गोष्टी नुसत्या विसरून जायसाठीं वाचायच्या काय? माझ्या वाट्याला जें आलं आहे तें या पुस्तकांतल्या वर्णनापेक्षां किती निराळं? तिची नजर हळूंच पलीकडच्या कोपऱ्यांतल्या अंथरुणाकडे वळे. रॉकेलच्या डबड्यांच्या लालसर अंधुक प्रकाशांत अंथरुणावर परसलेल्या शिवरामची आकृति व लगतच्या भिंतीवर पडलेली त्याची विचित्र सांवली तिच्या दृष्टीस पडे, पहाटेचा गार वारा सुटलेला असे. शिवराम एखादेवेळेस अंगावरचं कांबळं सरसावून या कुशीवरचा त्या कुशीवर होई, आणि एखाद्या जनावराप्रमाणें मोठ्यांदा श्वास सोडी. तें पाहिलं की पार्वतीचं सबंध अंग शहारून जाई. अंतःकरणांत उठणारी तीव्र असमाधानाची लहर आवरावी कशी तें तिला कळेनासं होई...

ती पुस्तक टाकून देई, खोलीतून बाहेर गोठ्यांत जाई, अन् खराटा हातीं घेऊन शेणमूत झाडायला सुरुवात करी, ओटीवर निजलेला तिचा सासरा खराट्याचा आवाज ऐकून विचारी,

"कोन त्यें?"

ती म्हणे, "मी!"

"कोंबडं आरवल्येलं तर ऐकल न्हाई, पहाट झाली व्हय?"

"न्हाई, अवकाश हाये. तुम्ही निजा."

ज्या तऱ्हेचं आयुष्य आपल्या वांट्याला आलेलं आहे त्यांत उघड उघड आपली फसवणूक झालेली आहे हा विचार पार्वतीच्या मनांत उत्तरोत्तर इतका बळावूं लागला, आणि त्यांतून उत्पन्न होणारं असमाधान तिला इतकं तीव्रतेनं जाणवूं लागलं, कीं ती मनाशीं म्हणूं लागली, हें जर असं आहे तर हें मी मुकाट्यानं सोसायचं काय म्हणून? मानेवरचं हें जोखड असंच राहूंच द्यायचं कशासाठीं? एकीकडे असले विचार तिच्या मनांत जोरानं उसळून येत आणि दुसरीकडे तिला त्यांचं भय वाटे. ज्या पुस्तकांच्या वाचनानं

व मग आपोआप थांबेल अशी तिला थोडीशी आशा वाटे. ती गप्प राही. आत्तांदेखील याच विचारानं ती नर्मदेला कांहीं बोलली नाही.

श्रीपतीचं डयूटीचं नाक बदललं व तो त्या चौकांत येईनासा झाला तेव्हां म्हातारीला बरं वाटलं. परंतु दोन दिवसानंतर श्रीपती आपली दुसऱ्या नाक्यावरची डयूटी आटपून नर्मदेकडे आला आणि नुसताच तिच्याशीं गोष्टी करीत बसला नाहीं, तर जातांना तिला आपल्याबरोबर घेऊन गेला ! हळू हळू त्या दोघाचा हा नित्याचाच क्रम झाला. मग मात्र म्हातारीच्यानं राहवेना. एके दिवशीं ती नर्मदेला म्हणाली,

" नमे, मी इच्यारते त्याचा खराखरा जबाब देशिल काय ? तुझ्या आईची आण हाये तुला. "

" माझी आई म्या डोळ्यानीं बगितलीबी न्हाई." नर्मदा म्हणाली, "मी चार म्हैन्यांची व्हते तवाच ती आटपली. मला सावत्र आई हाये, पर ती मेली तर मला कायबी वाटायचं न्हाई—टिपूसबी यायचा न्हाई माझ्या डोळ्यांतनं. तिच्या जाचाला कंटाळूनशान तर बापाचं घर सोडून मी म्हमईला आलें. मग माझ्या आईची आण काय घालतीस मावशी ! "

" बरं आण न्हाऊं दे, पर खरं त्ये सागशिल नव्ह मला ?... त्या शिपाईदादासंग तूं सिनेमाला जात असतीस आताशा ह्ये खरं काय ? त्यो लगीन करणार हाये काय तुझ्यासंगं ? "

नर्मदा म्हणाली, " मावशी, अन्नाच्यानं सागत्यें तुम्हास्नी श्रीपती वंगाळ वाटत असल, पर तसा न्हाई. त्यो लई चागला हाये अन् त्याचा माझ्यावर लई जीव हाये. "

" जिवाच्या गोष्टी नग सांगूस. त्यो हाये कुठला ? त्यो तुझ्याशीं लगीन करणार हाये काय ? "

नर्मदा म्हणाली, " साताऱ्याकडं बुध नावाचं एक लहानसं खेड हाये. तिथला हाये श्रीपती. तिथं थोडी शेती हाये त्येच्या घरची. बायकामुलं हायती त्येला. तवा लगीन कसं करील त्यो माझ्यासंगं ? सरकारनं आतां नवा कायदा केलाया ना. पर असंना का कायदा, मी श्रीपतीजवळ तशीच राहीन. "

म्हातारी एकदम दचकून म्हणाली, " नमे, तूं गाढव हायेस! श्रीपतीची राख व्हनार तूं? असल्या जिण्यानं तुला काय मिळल ग?"

" मला व्हय? माझा श्रीपती मला मिळल ना. त्यें काय थोडं झालं मला!" असं म्हणून नर्मदेनं म्हातारीवरची आपली नजर काढली आणि समोर अंतराळात पाहिल्याप्रमाणं ती पाहात राहिली.

काल रात्रीं ती श्रीपतीबरोबर राहिली होती. प्रेमाच्या क्रीडा करतां करतां श्रीपतीनं तिला कितीतरी गोड गोड गोष्टी सागितल्या होत्या. त्याच्या तोंडावर हात ठेवून ती वरचेवर म्हणाली होती, " असलीं बोलणीं कशापायीं करतुयास माझ्यासंगं! मला तुझा पैसा नग, अडका नग, मला फक्त तूं व्हावास. माझा श्रीपती असा सदा गळयाच्या मिठींत मला व्होवा. मीं तुझ्यापाशीं कधीं काय मागितलं रे?" अस बोलतां बोलतां आजपर्यंत जी मर्यादा तिनं त्याला राखायला लावली होती तिच्या पलिकडे जाण्याचा मोह त्याला व्हावा म्हणून तिनं त्याच्या ओठांवर आपले ओठ टेकले होते. आणि तो मोह त्याला झाल्याप्रमाणं त्याचे हात जेव्हां तिच्या वक्षस्थळाशीं खेळूं लागले होते तेव्हां तिची सारी लाज तिला टाकता आली होती. मग त्याच्या मिठींत पडून ती किती वेळ तरी आपल्या सुखाचं वर्णन त्याला सांगत राहिली होती. बोलतां बोलता ती मधेच म्हणाली होती,

" श्रीपती, मला गोड वाटावं म्हून कायीबी करशील?"

तो म्हणाला. होता, " हा काय सागशील ते करीन!"

" बघ, न्हाई म्हनशील."

" छट्!"

" बघ हं."

" हां हां, बघितलं."

तिनं चटकन् दूर होऊन खुंटीवरच्या त्याच्या युनिफॉर्मच्या खिशांतली शिटी काढून त्याच्यापुढ धरली होती, " ही वाजीव एकदां!"

तिच्या त्या विचित्र मागणीनं अत्यंत आश्चर्यचकित होऊन श्रीपती तिच्याकडे पाहात राहिला होता. " नर्मे तुला खूळ लागलंया काय?"

" व्हय." ती म्हणाली होती. " तुझ्या या शिळेनंच मला खूळ लागलंया. ही ऐकली कीं मला कसं वाटतं त्यें तुला सांगतां येत न्हाई. ती ऐकली की रानावनाची, वढ्यांतल्या पान्याची, मोटंच्या कुई कुई आवाजाची, किलबिल् करणाऱ्या पाखरांची, बाजरीच्या शेतांची, मी लहानगी होते तवा माच्यावर चढून 'हा हूर्‌ऽ' करूनश्यान मी गोफण काडकन् मारीत असे त्येची याद येती मला. अन् ती याद आली कीं जिवाला लई ग्वाड वाटतंय. धर–धर ही शिटी अन् घाल शीळ ! "

बोलतां बोलतां भावनांचा आवेग अनावर होऊन तिचा चेहरा फुलून गेला होता. व तिचा कंठ सद्‌गदित झाला होता. तिचं इतकं बोलणं श्रीपतीनं कधी जन्मांत ऐकलं नव्हतं. त्यानं तिला झटकन् जवळ घेऊन तिचे मुके घेतले होते व तिला छातीशी धरून एखाद्या हट्टी लहान मुलाला डोलवावं त्याप्रमाणं तिला डोलवीत तो म्हणाला, " नमे ! आता एखाद्या रजेच्या दिवशीं मी तुला लांब समुद्रकाठीं घेऊन जाईन व तुझ्यासाठीं शिटी घालीन. एकदां नाहीं दहादां ! ड्यूटीवर असतांना वाजविण्याची ही शिटी आहे. ती वाजविली तर आजूबाजूचीं सारीं माणसं धावत येतील. "

तिनं विचारलं होतं, " शप्पथ; घेऊन जाशील मला ? "

तो म्हणाला होता, " तुझ्या गळ्याशपथ ! " त्यानं तिच्या गळ्याच्या खळगीवर हात टेकला होता. व मग त्याचा हात खाली सरकून जेव्हां अंगाशीं भिडला तेव्हां लहानपणीं पाहिलेल्या पेल्याच्या आकाराच्या लहान-लहान रंगीत रान फुलांतला मध घेण्यासाठीं त्या फुलाभोंवती फिरणाऱ्या भुंग्यासारखा त्याचा तो हात तिला वाटला होता. त्यानं शिटी वाजविली नव्हती तरी तिला हवी ती शीळ तिला अगदी स्पष्ट ऐकू आली होती. तिनें डोळे मिटून घेतले होते. दुसऱ्याच क्षणीं ज्या सुखाची लाट तिच्या सर्वांगावरून उसळली होती, त्यांत तिनं स्वतःला खुशाल बुडूं दिलं होतं....

या सर्व आठवणी तिच्या मनांत उभ्या राहिल्या व ती अंतराळांत पाहात राहिली.

म्हातारी अधिक बोलली नाहीं. पण या पोरीचे चांगलेच कान उपटले पाहिजेत असा तिनं मनाशीं निश्चय केला.

तथापि म्हातारीचा तो निश्चय तसाच राहिला ! कारण दोन दिवसांनीं नर्मदा फळं विकायला येईनाशी झाली. कांहीं दिवस गेल्यानंतर म्हातारीला कुणीतरी सागितलं, कीं ती श्रीपतीची रखेली म्हणून राहूं लागलेली आहे. ही बातमी ऐकल्यावर म्हातारी मनाशीं म्हणाली, " पोरीनं सत्यानाश करुनश्यान घेतला आपल्या जल्माचा ! आतां कुठलं सुख येतंया तिच्या वांटयाला ! "

परंतु आपण आपल्या जन्माचा सत्यानाश करून घेतला असं स्वतः नर्मदेला मुळींच वाटत नव्हतं. ' आतां कुठलं सुख आपल्या वाटयाला ? ' असा उद्‌गार तर तिच्या तोंडून निघणं शक्यच नव्हतं. कारण आतां सुखाशिवाय आपल्या वाटयाला दुसरं कांहीं येणार नाही अशी तिची खात्री होती. आपल्या जन्माचं सार्थक झालं असं तिच्या मनांत सारखं येत होतं. श्रीपती तिच्याशीं फारच चागलं वागत होता, तिचा एकहि शब्द खालीं पडूं देत नव्हता. प्रेमानं तो तिचा दास बनला होता; ती त्याच्यावर हवी तशी सत्ता चालवित होती. त्याला डयूटीवर जावं लागे तेवढा वेळ सोडला तर बाकीच्या वेळांत तो क्षणभरदेखील तिच्यापासून दूर राहात नसे. तो सारखा तिच्या भोंवतीं असे. ती जरादेखील दृष्टीआड झालेली त्याला चालत नसे. ती स्वयंपाक करीत असली, लुगडं बदलीत असली, केर काढीत असली तरी तो तिच्या मागं मागं करी. त्याचं तें वागणं पाहून तिनं त्याची थट्टा करावी, " जरा दूर बस ना ? म्यांव म्यांव करीत सारख पायांत घोटाळणाऱ्या मांजरावानी काय करतुंस ? " त्यानं म्हणाव, " तूं आपल्या ताटाखालचं मांजरच केलंस कीं मला. " तिनं विचारावं, " मला सोडूनश्यान कधीं कुठंबी जानार न्हाईस ? " " अंह. " असं म्हणून त्यानं तिच्या उरोभागावर डोकं टेकावं व त्या ठिकाणीं तें घासल्यासारखं करावं. गुदगुदल्या झाल्यामुळं ' ईऽऽ ' असं गोड आवाजांत ओरडून तिनं त्याचे केंस खसखसून चोळावे आणि पुन्हां विचारावं, " कधींबी जायचा न्हाईस मला सोडूनश्यान ? " त्यानं तिच्या वक्षस्थळामधल्या खोल जागीं तोंड तसंच ठेवून म्हणावं, " अंह, माझ्या लाडक्या नमीला सोडून मी कधीं जायचा नाहीं. " त्याचा गुदमरलेला आवाज ऐकतांच नर्मदेचा जीव अगदीं हरखून जाई.

एके दिवशीं तो म्हणाला, " नमे, तुला एक गोष्ट सांगायची आहे. " ती म्हणाली, " सांग कीं. "

" घरून निरोप आला आहे, माझी बहीण आजारी आहे. गांवीं जावं लागणार आहे मला. "

हें सांगतांना त्याची चर्या एखाद्या अपराध्यासारखी झाली होती. तिला सोडून जाण्याची कल्पना त्याला सहन होत नव्हती हें अगदीं उघड दिसत होतं. त्याची ती वृत्ति पाहून नर्मदेला आनंदाचा आणि करुणेचा गहिंवर आला. त्याला जवळ ओढून कुरवाळीत ती म्हणाली,

" मग जा कीं गांवाला. इतकं अवघड कशापायीं वाटून घेतुयास ? तुझ्या जिवावर आलंया व्हय ? "

" होय, तुला सोडून कधीं जाणार नाहीं असं मीं वचन दिलं होतं अन् आतां मी जातों म्हणतोंय. मला फार शरम वाटते. " त्यानं घुटका गिळला तो नर्मदेला स्पष्ट दिसला.

त्याच्या मनाचा खेद घालविण्यासाठीं ती हंसली व म्हणाली, " शरम वाटतीया ? येडा तर न्हाईस तूं श्रीपती ? मी रागावेन असं म्या वाटलं व्हय तुला ? छट् ! मी कशी रागावेन ? जा, जा तूं. लवकर परत मातर ये हं. धा–पंधरा दिवसांत येशील, नव्हं ? "

तो म्हणाला, " ते कां ? बहिणीला भेटतों. तिचं औषध पाणि पाहतों, आणखी धावत येतों तुझ्याकडे. "

" मग झालं तर. आतां नग अवघड वाटून घेऊं; जा तूं, अन् हें बघ परत यायची उगाच घाईबी करूं नगस. माझी काळजी करायची न्हाई बघ. मला गमायचं न्हाई तुझ्याबिगर; पर नीट न्हाईन. आनंदांत न्हाईन. तुझ्या गळ्याशपथ. "

अशा प्रकारें त्याची समजूत घालून नर्मदेनं त्याला गांवीं जायला लावलं खरं; परंतु तो गेल्यानंतर दोन दिवस झाले नाहींत तोंच तिला त्याच्या विरहाचं दुःख असह्य वाटूं लागलं. आणखी दोन दिवस तिनें कसेबसे काढले, मग मात्र तिला अगदीं राहवेना. तिनं सरळ खोलीला कुलूप

लावलं आणि स्टेशन गांठलं. साताऱ्याच्या स्टेशनावर उतरायचं आणि तिथून बुध गांवाची वाट विचारीत जायचं, एवढ तिला माहीत होतं. आणि ही गोष्ट आपणाला सहज करता येईल अशी तिची खात्री होती. श्रीपतीच्या बायकामुलांना आपलं अस्तित्व माहीत नाहीं, त्याच्या घरीं आपण एकदम जाऊन उभ्या राहिलों तर त्या माणसांना काय वाटेल, अथवा तें श्रीपतीला आवडेल कीं नाहीं, इत्यादि गोष्टींचा नीट विचार करायला तिचं मन मुळींच तयार नव्हतं. श्रीपती तिच्या डोळ्यांना चार दिवस दिसला नव्हता, त्याचं गोड बोलणं तिला ऐकायला मिळाल नव्हतं. त्याच्या रोमाचकारक स्पर्शावाचून तिचं शरीर राहिलं होतं. दूर राहणं तिला अगदीं अशक्य झालं होतं. म्हणून ती निघाली होती. 'काय व्हायचं असेल तें होवो, श्रीपतीच्या गावीं जाऊन त्याचं घर गाठायचं आणखी त्याला डोळे भरून पाहायचं,' हा एकच विचार तिच्या मनांत होता. आणि तो अमलात आणण्यांत कोणतीहि अडचण येणार नाहीं अशी तिची खात्री होती.

परंतु ती प्रत्यक्ष बुधगांवी जाऊन श्रीपतीच्या राहत्या घरापाशी पोचली तों त्याच्या घराला कुलूप लागलेल तिला दिसलं. श्रीपतीच्या बिऱ्हाडाच्या बंद दाराकडे पाहिल्याबरोबर नर्मदा गोंधळून गेली. कारण केव्हां एकदा श्रीपतीचं घर येईल असं वाटण्यासारख्या कांहीं गोष्टी घडल्या होत्या. बुधसारख्या खेडयाचं स्वरूप तिला अपरिचित नव्हतं. तिचं बालपण या भागात गेलं नव्हतं, खानदेशात गेलं होत. परंतु कुठलंहि खेडं म्हटल कीं तिथल्या आयुष्याचा ठरीव ठसा असतो. गरीब व श्रीमंत, पापभीरु आणि पापी, सात्विक आणि हलकट अशा लोकांचें खेडयांतले ठरीव नमुने असतात; आणि ज्याला खेडयांतल्या व्यवहारांचा व राहणीचा अनुभव आहे अशा माणसाला कोणती व्यक्ति कोणत्या नमुन्याची आहे हें चटकन् हेरतां येतं. गांवाची शीव लागल्यापासून नर्मदेनं ज्या चारपांच इसमांना श्रीपतीचं घर कुठं आहे म्हणून विचारलं होतं त्या सगळ्याच्या तिच्याशीं बोलण्याच्या तऱ्हेवरून ती मनांतल्या मनांत भ्याली होती. त्यापैकीं एकानं तर तिला श्रीपतीच्या घराची खूण सांगितल्यावर आपल्या दोस्ताला म्हटलं होतं, "श्रीपतीनं म्हमईला एक पांखरू ठेवलया असं ऐकलं होतं खरं. त्यें ह्यें व्हय? ठेवण्यालायक हाये

खरं." ते दोघे आपापसांत फिदीफिदी हसले होते. या खेडेगांवांतल्या अस्सल टग्यांपैकीं या व्यक्ति असल्या पाहिजेत याबद्दल नर्मदेची खात्री पटली होती. मनांतल्या मनात अगदीं भेदरून जाऊन नर्मदेनं झपाझप पावलं टाकली होतीं. श्रीपतीचं बिऱ्हाड एकदा गांठलं की सुटलों असं तिला झालं होतं. आणि आतां ती पाहते तों श्रीपतीच्या बिऱ्हाडाला कुलूप होतं !

बरोबर आणलेलं सामानाचं लहानसं बोचकं घरापुढच्या कट्टयावर टेकून ती तशीच उभी असतांना कुणीसं तिला विचारल,

" तुम्ही अशा कां घरापुढं उभ्या राहिलांत ? तुम्हांला कोण पाहिजे ? कुठल्या तुम्ही ? "

नर्मदेनं पाहिलं तों तिच्यापुढं एक म्हातारा माणूस उभा होता. तिनं आपली हकिकत थोडक्यांत त्याला सांगितली तेव्हां तो म्हणाला, " श्रीपतीची बहिण इथं राहात नाहीं. रुई नांवाचं गांव आहे तिकड राहते. श्रीपती पाच दिवसाखालीं इथं आला तो आपल्या बायकामुलांना घेऊन रुईला गेला आहे. "

तें ऐकून नर्मदेला अगदी घोटाळ्यांत पडल्यासारखं झालं. " आतां कसं करावं ? " असा दीनवाणा उद्गार तिच्या तोंडांतून बाहेर पडला. कांहीं वेळ गप्प उभं राहून तिनं विचारलं, " कुठसं हाये रुई गाव ? "

" पुष्कळच दूर आहे. " तो म्हातारा म्हणाला. " आतां जवळ जवळ तिन्ही सांजा झाल्या. यापुढं कुठं जाणार तुम्ही ? "

" मग कसं करू ? "

" तुम्ही असं करा. आजची रात्र माझ्या घरीं काढा. मी या घराचा मालक आहें. शेजारींच राहतों. उद्यां सकाळीं तुमच्याबरोबर एक माणूस देतों, तो तुम्हाला रुई गावाला पोचवील, लाबनं आला आहात, दमला असाल. या माझ्या घरी. संकोच करूं नका. तुम्ही मला लेकीप्रमाणं आहांत."

त्याची ती सूचना मान्य करण्यास नर्मदेचं मन तात्काळ तयार होईना; पण ती मान्य करण्याशिवाय तिला दुसरा मार्गच उरला नव्हता व ती जरी साशंक मनानं त्याच्याबरोबर घरांत गेली तरी नंतर तिचं मन निःशंक आणि स्थिर झालं. तो म्हातारा खरोखरच फार चांगला होता, व त्याची

म्हातारी बायकोहि फार प्रेमळ होती असं तिला दिसून आलं. मात्र त्या दोघांनीं तिला खूप आग्रह केला तरी ती जेवली नाहीं. रात्रीं तिला झोपहि लागली नाहीं. श्रीपतीबरोबर रात्रीचा वेळ घालवितांना रात्र किती थोडी असते असं तिला वाटत असे. पण रात्र किती मोठी व कंटाळवाणीहि असूं शकते तें तिला आज कळलं.

सकाळीं उजाडल्याबरोबर ती उठली. म्हातारीनं फारच आग्रह केला तेव्हां तिनं थोडासा चहा घेतला. म्हाताऱ्यानं बोलवून आणलेला माणूस ओटीवर तयार होता. " बबऱ्या, नीट जपून घेऊन जा हं बाईला. " असं म्हाताऱ्यानं त्या माणसाला बजावलं. आपलं लहानसं बोचकं उचलून घेऊन नर्मदा बबऱ्याबरोबर म्हाताऱ्याच्या घराबाहेर पडली.

वाट चालता चालता त्या दोघांच्या गप्पाहि चालू होत्या. बबऱ्या तिला मुंबईच्या हकिगती विचारीत होता, व स्वतःचे अनुभव सागत होता. तो मधूनमधून मुंबईला जात असे असं दिसलं. मधेच तो म्हणाला, " आतां पुढच्या वक्ताला म्हमईला आलों कीं तुमच्याकड येऊन चहापानी घेतलं पाहिजे. " नर्मदा हंसून म्हणाली, " चहापानीच काय म्हणून ? आमच्याकडं उतरायाच या कीं. आम्ही ऱ्हातो ती जागा लई लहान हाये, पर घरच्यासारखं माणूस आल्यावर जागा कशीबी पुरतीया ! " अशाप्रकारें रमत रमत चालल्यामुळं वाटेकडे नर्मदेचं धड लक्ष नव्हतं. मधेच ती विचारी, " आणखी किती जायचंय ? " बबऱ्या उत्तर देई, " आता थोडं ऱ्हायलंय. " मग ती पुन्हां त्याच्याशी गप्पा मारूं लागे आणि आता खूपच वाढलेल्या उन्हाकडे अगर पायाखालच्या वाटेकडे तिचं लक्ष राहात नसे.

परंतु बऱ्याच वेळानं तिच्या एकदम लक्षांत आलं, कीं आपण गाडीरस्ता तर केव्हांच सोडलेला आहे. पण पाऊलवाटेनं देखील आपण चाललों नाहीं इतकंच नव्हे, तर दोन्ही बाजूंच्या डोंगराच्या अगदीं जवळून रानगवतानं झाकलेल्या अरुंद माळावरून आपण जात आहोंत आणि आपण दिशा बदलली नाहीं तर समोर थोडयाशा अंतरावर दिसणाऱ्या घळीतच आपण जाऊं ही गोष्ट तिच्या लक्षात आल्यावर ती एकदम जागच्या जागीं उभी

राहिली व तिनं बबन्याला विचारलं, " मला कुठं घेऊनश्यान चालला तुम्ही ? "

बबन्या म्हणाला, " कां ? भ्यायलीस व्हय ? " तो चमत्कारिक तऱ्हेनं हंसत होता व त्याच्या स्वरात भयंकर उद्धटपणा होता.

एकाएकी त्यानं एकेरी शब्दप्रयोग वापरून केलेला तो प्रश्न ऐकतांच व त्याची ती बदललेली चर्या पाहतांच नर्मदेच्या पोटांत धस्स झालं. पण आपलं भय लपवून तिनं उंच आवाजांत म्हटलं, " भीन कशापायीं ? माझे पायताण माझ्यापाशीं हाये ना. बऱ्या बोलानं इथून चला अन् रुईची वाट दाखवा. "

" वाटेनंच निघालोय कीं. चल. "

" आता एक पाऊलबी पुढं टाकणार नाहीं. बऱ्या बोलानं —"

परंतु तिचं वाक्य पुरं होण्याच्या आधींच बबन्यानं दोन्ही हाताचीं बोटं जिभेखालीं घातली व अगदीं कर्कश खणखणीत शीळ वाजविली. तीन चार वेळा त्यानं तशी शिटी फुंकली.

त्याच्या त्या करण्याचा अर्थ नर्मदेला कळेना. पण तो तिला लवकरच कळला. घळींतून पांच सहा पुरुष धांवत आले व जवळ येताच त्यांनीं तिला गराडा घातला होता. बबन्या धूम पळाला......त्याची कामगिरी संपली होती !

" मुकाट्यानं आमच्या संगत चल ; न्हाईतर हें पाह्यलंस काय ? " तिच्याभोंवतीं ज्यांनीं गराडा घातला होता त्यांतला एक इसम तिला म्हणाला.

कुऱ्हाड दाखविणाऱ्या त्या इसमाकडे पाहताच नर्मदेनं त्याला पुरतं ओळखल. काल संध्याकाळी ज्यानं तिच्याबद्दल चावटपणाचे उद्गार काढले होते तोच तो होता. त्यावेळीं फिदीफिदी हंसणारा दोस्तहि त्याच्या शेजारीं उभा होता. आणखीहि दोन चेहरे काल संध्याकाळीं तिनं पाहिले होते... आतां कोणत्या संकटाला सादर झालं पाहिजे तें नर्मदेनं ओळखलं...... ती त्यांच्याबरोबर पावलें टाकूं लागली. मनांतल्या मनांत तिला एकच अंधुक आशा होती, कीं कुणी खेडूत लोक कदाचित् भेटतील व ते आपल्याला संकटांतून सोडवतील. आजूबाजूला कुणी दिसतं का म्हणून

दूरवर नजर टाकून ती शोधीत राहिली पण तिला चिटपांखरूहि दिसलं नाहीं ! तिला वाटलं, निदान मोठ्यादा ओरडावं, हंबरडा फोडावा, म्हणजे कुणाला ऐकूं गेला तर कदाचित् उपयोग होईल. परतु तिच्या शुष्क घशांतून आरोळी बाहेरच पडेना. ती मनाशीं म्हणाली, 'आतां मात्र मी पुरती मेल्यें—...' तिनं डोळे झांकून घेतले....

जवळ जवळ अडीच तासांनीं जेव्हा तिनं डोळे उघडले तेव्हां आपण मेलों नाहीं याचंच दुःख तिला झालं ! तिच्या अंगावरचे दागिने गेले होते, तिचं गांठोडं गेलं होतं, तिच्या अंगावरची साडी आणि चोळीहि गेली होती आणि त्या सहाजणांनीं तिच्यावर अमानुषपणें बलात्कार केला होता. 'मी खरंच जिवंत आहे काय ' अशा शंकेनं तिनं भोंवतालीं पाहिलं. सूर्य आतां अगदीं माथ्यावर आला होता. त्यामुळं त्या अरुंद घळींतहि रखरखीत ऊन पडलं होतं. नर्मदेनं आपल्या नग्न शरिराकडे पाहिलं, आपली विटंबना पाहिली आणि दोन्ही हातांनीं तोंड घट्ट झाकून घेऊन ती ओरडली, "देवा मला मरण का रे न्हाई दिलंस ! " ती हुंदके देऊन रडूं लागली. पण त्या कोरडया हुंदक्यानीं तिचा घसा दुखला, तिच्या डोळ्यातून येणारं पाणी एखाद्या उष्ण झऱ्यांतल्या पाण्यासारखं होत. मुंबईहून निघाल्यापासून ती उपाशी होती. तिच्या पोटात निघणाऱ्या शिणका तिला तरवारीच्या पात्याप्रमाणं वाटत होत्या. तिच्या अंगाची आग होत होती. तिच्या हातापायांत काडीमात्र शक्ति उरली नव्हती......

पण कांहीं वेळानं सारी शक्ति एकवटून ती सरपटत सरपटत घळीबाहेर आली व तशा त्या लज्जास्पद अवस्थेंत ओरडूं लागली. त्याच सुमारास जळणासाठीं रानांत काटक्या वेचायला आलेल्या तीन बायका त्या बाजूनं चालल्या होत्या. त्या तिच्या हांका ऐकून धांवत आल्या. त्या बायकांनीं तिला जवळच्या खेड्यावर नेलं, आधीं चांगलं न्हावूं घातलं, मग वस्त्र दिलं आणि खाऊ घातलं. त्या बायकांच्या दादल्यांनीं चावडीवर जाऊन एकंदर प्रकाराचा रिपोर्ट केला. हलके हलके कायद्याचीं यंत्रं फिरलीं आणि तपासासाठीं पोलीस अधिकारी आले. त्यांनीं सारी हकीकत नर्मदेकडून ऐकल्यावर आधीं बुधला जाऊन बबन्यीला पकडलं. भरमाप्पाचा थोडासा

प्रसाद दिल्याबरोबर नर्मदेवर बलात्कार करणाऱ्या लोकांची नांवं त्यानं पटापट सांगितलीं. पोलीसांनीं त्यांना पकडलं व झडत्या घेतल्या. पण नर्मदेचे दागिने किंवा कपडे सापडले नाहींत. तरीहि पोलीसानीं केस केली. ती साताराच्या कोर्टात सुरू झाली. मध्यंतरीं श्रीपती येऊन नर्मदेला मुंबईला घेऊन गेला होता. खटल्याची जेव्हां जेव्हां सुनावणी असेल तेव्हां तो तिला मुंबईहून घेऊन येत असे. खटला चालायचा त्या रितीनं चालला आणि संपला ! नर्मदेच्या अंगावर किरकोळ खरचटण्यापलिकडे मोठी अशी जखम नव्हती. तिच्याशीं आपण संभोग केला ही गोष्ट साऱ्या आरोपींनीं कबूल केली; पण त्यांनीं सांगितलं, " या पोरीनंच आम्हाला स्वखुषीनं घळींत बोलावलं होतं. " त्यामुळें बलात्काराचा आरोप सिद्ध झाला नाहीं. सारे आरोपी सुटले !

श्रीपती पुन्हां कधीं बुध गांवाला गेला नाहीं. आपण त्या गांवीं गेलों तर नर्मदेवर ज्यांनीं बलात्कार केला होता ते टगे कुऱ्हाडीनं आपली खांडोळीं करून टाकतील हें त्याला माहीत होतं. तो म्हणे, " मी पोलीस आहें. पण बुधसारख्या खेड्यांत कायद्याचं राज्य चालतंय कुठं ? धटिंगणांचंच चालतं. बेचाळीसची चळवळ झाली आणि आतां कॉंग्रेसचं राज्य आलं तरी खेड्यापाड्यांतून मात्र गुंडगिरीचंच खरं राज्य आहे. " नर्मदेची विटंबना करणाऱ्या लोकाचा बदला घ्यावा असं त्याच्या वरचेवर मनांत येई; परतु त्या बाबतींत आपण सर्वस्वी दुबळें आहोंत हें त्याला माहीत होतं. त्याच्या हातात एकच गोष्ट होती, ती म्हणजे नर्मदेला सांभाळणं, झालेल्या प्रकाराची तिला आठवणदेखील होणार नाहीं असं वागणं, तिच्यावर पूर्वींहूनहि अधिक प्रेमाचा वर्षाव करणं. हें तो करी आणि त्याचं ते वागणे पाहून नर्मदेला भारी सुख होई. परंतु जे झालं त्याची आठवण तिच्या मनांतून काही केल्या जाईना. अंथरुणांत श्रीपतीच्या मिठींत ती पडलेली असताना ती अेकदम दचकून जागी होई, वेडयासारखे हातवारे करू लागे आणि ओरडत सुटे. श्रीपतीनं तिला जवळ घेऊन विचारावं, " काय झालं ? " तिनं म्हणावं, " तुम्ही नाहीं अैकली ? मीं स्पष्ट अेकली. " " काय ! " म्हणून श्रीपतीनं विचारलं

कीं तिनं म्हणावं," शीळ ! त्या चांडाळ बबन्याची ती कर्कश शीळ ! अजून अैकूं येते आहे मला ! अैका, अैका ! " तिनं डोळे झांकून घ्यावेत, हंबरडा फोडावा आणि अिकडे तिकडे धावूं लागावं !

ती सावध झाली कीं म्हणे, "श्रीपती, कांहीं केल्या ती कर्कश शीळ माझ्या डोक्यातून जात नाहीं रे !" ती त्याला मिठी मारी आणि रडूं लागे. त्यानं कितीहि समजूत घातली तरी तिचं रडणं थांबत नसे.

एकदां रडता रडतां श्रीपतीच्या मिठींतून ती दूर झाली. खुंटीवर श्रीपतीचा युनिफार्म होता. तिकडे ती गेली. खिशांतल्या शिटीची साखळी ओढून तिनं बाहेर काढली आणि ताडकन् साखळी तोडून टाकून शिटी हातांत घेऊन ती म्हणाली, "श्रीपती, ही सुद्धा शिटी मला आतां कधीं ऐकायची न्हाअी. निसतं बगितलं तरी त्या शीळेची मला याद येती ! पुन्हां कधीं शिटी वाजवूं नगस ! चाकरी सोडूनध्यान दे. आपण फळं अिकायचा धंदा करूं !"

श्रीपती तिच्याकडे पहातच राहिला. ती खिडकीपाशीं गेली व ती उघडून तिनं शिटी बाहेर फेकून दिली.



# तिच्या हृदयाची हांक : ७

त्याच्या आणि त्याच्या आईच्या धडपडीशीं ती अधिकाधिक समरस होत गेली...आणि अखेर तिच्यापुढें प्रश्न उभा राहिला.. ...स्वतःचं आयुष्य दुःखमय करून घ्यायचं, कीं जो पुरुष तिच्यावर प्रेम करीत होता त्याला निराश करायचं ?

वसंत ऋतु सुरू झाला होता. अशावेळीं लिलि अन् गॉर्डनच्या लक्षांत आलं कीं आपण प्रेमांत सांपडलों आहोंत. असं कांहीं व्हावं अशी तिची इच्छा नव्हती, परंतु हॅरी ट्रॅव्हर्स नांवाच्या एका पुरुषावर ती प्रेम करू लागली होती खरी. त्याच्यावर आपलं प्रेम जडलं याचं काय कारण असाव म्हणून ती कधीं कधीं स्वतःशीं विचार करीत बसे. पण तिला कांहीं आपल्या प्रेमाचं कारण निश्चित करतां येत नसे. मग तिला वाटू लागे हॅरी ट्रॅव्हर्सचा एक पाय खोटा—लांकडाचा आहे म्हणूनच आपलं प्रेम त्याच्यावर बसलं कीं काय कुणास ठांऊक ?

या सुमारास ती एका फॅक्टरींतल्या नोकरीवर होती. जराशा उभट चेहऱ्याची, पिंगट तकतकीत वर्णाची, स्वभावानं फार धीट आणि फार मायाळू. आपल्या मनांतल्या गोष्टी सहसा तोंडावाटें न काढणारी अशी लिलिअन् ही एक तरुण मुलगी होती. तिच्या पिंगट डोळ्यांच्या नजरेंत प्रेमळपणा ओतप्रोत भरलेला होता, व दुसऱ्या माणसावर मुग्धपणें विश्वास टाकण्याची वृत्तीहि स्पष्ट दिसत असे. लिलिअन् ज्या फॅक्टरींत काम करीत असे तिथेंच ऑर्थर ऑस्टीन नांवाचा एक तरुणहि कामावर होता. त्याच्या चेहऱ्यावर पुरळ उठलेलं होतं. ती ज्या खोलींत काम करीत असे तिथें तो वरचेवर

येई, आणि ती खोलींत नसली कीं तिच्या टेबलावर हळूच चोरून चिठ्ठी ठेवून जाई. ऑस्टिनच्या या वागण्याची थट्टा करून लिलिअन् हंसे. आपल्याप्रमाणें तोहि बिचारा प्रेमांत सांपडलेला असेल अशी तिला कधीं कल्पना आली नाहीं.

तिची आणि ट्रॅव्हर्सची गाठ पडण्यापूर्वी एके दिवशीं दुपारीं ऑस्टिननं तिला आपल्याबरोबर जेवायला चलण्याचा आग्रह केला म्हणून ती त्याच्या-बरोबर गेली. कोपऱ्यावरच्या छोटयाश्या दुकानांत जाऊन दोघांनीं जेवण केलं. ऑस्टिनचं लक्ष खाण्याकडे नव्हतं हें प्रथम तिच्या कांहीं ध्यानांत आलं नाहीं. परंतु जेवणाचा मुख्य भाग संपून टेबलावर 'पुडिंग' आलं तेव्हां तिनं ऑस्टिनकडं पाहिलं तों त्याच्या फिकट किरमिजी रंगाच्या डोळ्यांत अश्रू आले होते. ते पाहून मात्र तिला वाटलं आतां ही स्वारी आपलं प्रेम बोलून दाखविणार जणू आपल्या लक्षांत कांहींच आलं नाहीं असं सोंग करून ती कांहींवेळ 'पुडिंग' खात राहिली. खरं म्हणजे त्याच्याकडे पहाणं देखील नको असं तिला झालं होतं. त्याचा तो पुटकुळ्यानीं भरलेला घाबरट चेहरा, जे प्रेम त्याला अन्य तऱ्हेनें प्रदर्शित करतां येत नव्हतं त्या प्रेमानं पाणावलेले त्याचे डोळे, आणि पुढ्यांतलं पुडिंग खाण्याऐवजीं उगीच घाबरट हालचाल करणारे त्याचे तांबूस हाडकुळे हात, या गोष्टी तिला अगदीं दृष्टीसमोर नकोशा वाटल्या.

मग एकदम ऑस्टिनला वाचा फुटली, आणि तिच्या विषयींच्या आपल्या भावना तो बोलून दाखवू लागला. मोठ्या आवेगानं तो बोलत होता, आणि त्यामुळे त्याचे शब्द एकमेकांत गुंतून अडखळत होते, परंतु लिलिअन्चं अंतःकरण त्या शब्दांनीं विरघळण्याऐवजी थंडगार राहिलं होतं. तो तिला विचारू लागला,

"कधीं कधीं तूं माझ्याबरोबर येऊं शकणार नाहींस काय? फिरायला म्हण किंवा सिनेमा बघायला म्हण. मला माहित आहे, कीं मी सामान्य आहे. अगदींच सामान्य आहे. परंतु माझ्याबरोबर एखाद्या वेळीं यायला कांहीं हरकत नाहीं. येशील?"

शेवटीं त्याचं बोलणं संपविण्यासाठीं तिनं उत्तर दिलं, " छे छे, मला येतां येणार नाहीं. रागावूं नका. पण येणं शक्य नाहीं मला. "

" कां नाहीं ? कृपा करून सांग. " कां नाहीं ! असं विचारतांना तो आपल्या सरळ काळ्या केसावरून आपला पंजा सारखा फिरवीत होता. जणूं असं काहीं केलं कीं आपल्या विचारण्यांत अधिक निश्चय आणि करारीपणा तिला वाटेल अशी त्याची कल्पना होती. त्यानं आणखी एकदां विचारलं, " सांग तरी, कां नाहीं ? "

तिनं कांहींच उत्तर दिलं नाही.

पुन्हां आपला पंजा केसांवरून दाबून फिरवीत त्यानं विचारलं, " कृपा-करून सांग कीं, कां नाहीं ? काय कारण असेल तें सरळ सागून टाक. मी तुला नकोसा वाटतो ? मी तुला आवडत नाहीं ? "

ती म्हणाली, " नाहीं ! "

" पण कां नाहीं ! कां आवडत नाहीं मी तुला ! सांग ना, सरळ सांगून टाक. मी दिसायला चांगला नाहीं म्हणून होय ? "

हें भाषण संपविण्यासाठीं कांहीं तरी सांगून टाकलंच पाहिजे असा विचार करून तिनं उत्तर दिलं, " अं...कुणास ठाऊक ! " पण मग नंतर त्याच्या फिक्कट आरोग्यशून्य चेहऱ्याकडे सरळ नजर रोखून ती म्हणाली, " तुम्ही पुरेसा व्यायाम कां नाहीं घेत ? "

" हेंच काय तुझ्या नकाराचं खरं कारण ? " तो म्हणाला, " एवढंच ? एवढंच वाटतं तुला ? "

ती म्हणाली, " हं. मला वाटतं ते तुम्हांला सांगितलं. तुम्ही अगदीं व्यायाम घेत नाहीं. सिनेमा फार पाहतां तुम्ही. " आपण जें बोलतों त्या-बद्दल आपली अगदीं खात्री आहे असं त्याला वाटाव म्हणून ती अधिकच आवेशानं बोलूं लागली, " तुम्ही मिठाई फार खाता. सिगारेटस् फार ओढतां. आपल्या शरीराची—आरोग्याची अगदीं काळजी घेत नाहीं तुम्ही...."

तिचं बोलणं संपण्यापूर्वीच ऑस्टिन एकदम उठला व हॉटेलाबाहेर पडला

या प्रकारानंतर लिलिअन् दुपारच्या जेवणासाठीं त्या हॉटेलांत एकटीच जाऊं लागली. ऑस्टिननं तिच्याशीं बोलणं सोडून दिलं. आठ दहा दिवसानंतर तिला कुणीसं सांगितलं कीं तो फॅक्टरींतली नोकरीहि सोडून गेला. कां आणि कुठें तें कुणालाच माहीत नव्हतं. आतां वसंतऋतु नुकताच सुरू झाला होता. लिलिअन् हॉटेलमध्यें बसल्या बसल्या बाहेर पाही तेव्हां सूर्यप्रकाशानं चमकणाऱ्या वृक्ष शाखांना घासून जाणारं धुकं तिला दिसे, तें अगदीं नाजुक आणि कधी हिरवं तर कधीं 'ऑलिव्ह' रंगाचं आणि कधीं कधीं जवळ जवळ पिवळं असे. बाहेरच्या प्रदेशांतल्या बागेबागेंतून "लिल्याक"च्या झाडावर काळसर तांबडया रंगाच्या कळया फुटल्या होत्या; आणि हॉटेलच्या खिडक्यांतून ठवलेल्या 'डॅफोडिल'चीं रोपटीं फुलांनीं बहरून सूर्यप्रकाशांत हालत होतीं. त्याकडे पाहून ऑस्टिनची आठवण करतां करतां तिला वाटे, आपण त्याच्याशीं तसं बोललों तें जरा मूर्खपणाचंच झालं. मूर्खपणाचं आणि ज्यात कांहीं तथ्य नाहीं असं होतं तें आपलं बोलणं. कारण ती मनातल्या मनांत पुरतं जाणून होती, कीं पुरुषाच्या आरोग्याशी अगर सुदृढतेशीं प्रेमाचा कांहीं एक संबंध नाहीं. स्त्री जेव्हां प्रेमाचा विचार करते तेव्हां त्याच शरीर धडधाकट असलं पाहिजे. एवढंच का तिला हवं असतं? "डॅफोडिल"च्या शेपऱ्याकडे पहातां पहातां आणि ऑस्टिनची आठवण करतां करतां लिलिअन्‌ला समजून आलं, कीं तिला कांहीं केवळ पुरुषाच्या शरिराची सुदृढता पुरेशी वाटणार नव्हती, त्यापेक्षां अधिक कशाची तरी तिच्या अंतःकरणाला ओढ होती.

नंतर थोडयाच दिवसांनीं तिचं लक्ष ट्रॅव्हर्सकडे गेलं अथवा ट्रॅव्हर्सचं लक्ष आपल्याकडे असल्याचं तिच्या लक्षांत आलं. प्रत्येक मंगळवारीं व शुक्रवारीं तो त्या हॉटेलांत येई असं तिला आढळून आलं. तो सुमारें पस्तीस वर्षांचा असावा. तो शरीरानं जरा अवजडच होता. त्याची चर्या ममताळु होती. त्याचे केंस पिंगट होते आणि ते एखाद्या झुपक्यासारखे त्याच्या डोक्यावर दिसत. त्याच्या वागण्यांत आणि विचारांत शिस्त आणि निश्चयीपणा असावा असा तिनं तर्क केला. कारण तो ठराविक दिवशींच हॉटेलांत येई, आला कीं कोपऱ्यांतल्या एका ठराविक टेबलाशीं तो बसे,

आणि एका हातावर आपली हनुवटी अलगद टेकून मुळींसुद्धां हालचाल न करतां आपले कांहींसे धुंद निळसर डोळे तिच्याकडे लावून तो कितीतरी वेळ पहात बसे.

एका शुक्रवारीं तिच्या लक्षांत आलं कीं तो आपल्या ठरीव जागीं नव्हता. खिडकीबाहेर पाहिल्यावर झाडांच्या फांद्या एकदम तिला वठलेल्या दिसल्या असत्या तर तिला जसं वाटलं असतं तसंच तो आपल्या जागीं नसल्यामुळें तिला वाटलं.

ती हॉटेलच्या बाहेर पडली तेव्हां जिकडे पहावं तिकडे उदासपणा भरलेला आहे असं तिला वाटलं, आणि शून्यपणाची जाणीवहि तिला असह्य झाली. पण ती रस्त्यावरच्या प्रकाशांत आली तेव्हां एकदम ती जाणीव नाहींशी झाली. कारण ट्रॅव्हर्स तिच्या दृष्टीस पडला. एका जुन्या, निळ्या रंगाच्या मोटारमध्ये तो बसलेला होता. का कुणास ठाऊक पण तिला वाटलं, कीं तो आपलीच वाट पहात आहे. तिचे पाय फरसबंद पायवाटेवर एकदम थांबले, आणि ती थांबल्याबरोबर तो तिच्याशीं बोलला.

" आपण नेहमीं एकमेकांकडे पहातों, तेव्हा मी विचार केला, कीं थोडा बदल म्हणून एकमेकांशीं बोलावं तरी. " त्यानं अगदी साधेपणानं म्हटलं.

" हं. " एवढंच ती म्हणाली. पण तिचं अंतःकरण मित्रभावानं आणि आनंदानं भरलेलं होतं, आणि हृदयांत कोंडलेली कोणतीतरी भावना एकदांची मोकळी झाली असं तिला वाटलं.

मग थोडावेळ ती तशीच सूर्य प्रकाशांत शांत फरसबंद वाटेवर उभी राहून त्याच्याशीं बोलत उभी राहिली. हांकण्याच्या चाकावर त्याचे हात होते त्याकडे तिचं लक्ष गेलं. चांगले मजबूत मोठे हात होते ते. काबाड कष्ट करणाऱ्या पुरुषाचे असावे तसे. ज्याचे हात असे आहेत तो माणूस विचारी आणि निश्चयी स्वभावाचा असला पाहिजे असं तिला वाटलं. त्या हाताकडे पहातांना नव्हे पण नंतर बऱ्याच वेळानं तिच्या लक्षांत आलं कीं त्याच्या शरीराच्या मानानं त्याचे हात जरा जास्त मोठे होते.

ती निरोप घेऊं लागली तेव्हां, " उद्यां भेटशील का " म्हणून त्यानं विचारलं. तो म्हणाला, " आपण मग गाडींत बसून जाऊं. मी कुठें रहातो तें तुला दाखवीन. "

" कुठें रहातां तुम्ही ? "

तो म्हणाला, " येथून बरंच लांब गेलं कीं एक नदी आहे. त्या नदीच्या कांठापासून जवळच एक वाडी आहे. ती नदी पाहिली आहेस कां तूं ? "

ती म्हणाली, " नाहीं. गांव सोडून भोंवतालच्या प्रदेश मीं कधीं पाहिला नाहीं. तो पहावा अशी फार दिवस इच्छा आहे माझी. "

दुसऱ्या दिवशीं एक वाजतां ट्रॅव्हर्स तिला तिच्या फॅक्टरीच्या दाराशीं भेटला. तो गाडींत बसला होता. त्यानं तिच्यासाठीं दार उघडल परंतु त्यानं तें गाडींतून न उतरताच उघडलं. त्यानं तिला विचारलं,

" जेवायला जाऊं या काय कुठें तरी ? "

सुरू झालेल्या गाडीच्या थरथरणाऱ्या गिअरच्या दांड्यावरच्या त्याच्या मोठ्या हाताकडे पहात ती म्हणाली, " मी थोडसं खाल्लेलं आहे. मला भूक नाहीं. "

मग गाडी निघाली आणि प्रकाशानं न्हालेल्या रस्त्यांतून जाऊं लागली. तो म्हणाला, " आपण जर सरळ माझ्या वाडीवर गेलों तर तिसऱ्या प्रहरच्या चहाच्या वेळेच्या आंतच आपण पोंचूं. "

तिनं कांहींच उत्तर दिलं नाहीं. शांतपणे साऱ्या गोष्टींचे बेत आधीं ठरविण्याच्या त्याच्या स्वभावाचीं कांहीं लक्षणं तिला याच्या आधींच दिसलेलीं होतीं. त्या स्वभावानुसार त्यानं तिला आपल्या वाडीवर नेण्याच्या बेताचे सारे तपशील ठरल्यासारखे तिला दिसले. पण या क्षणीं तिला जर मुख्यतः कशाची जाणीव झाली असेल तर एकाच गोष्टीची. ती ही, कीं वेगानं निघालेली गाडी वसंत ऋतुला भेटण्यासाठीं चालली आहे असा भास तिला होत होता. 'बर्च' झाडांच्या नाजुक पातळ पानांतून सूर्याचीं किरणं खालीं काळसर रंगाच्या 'ब्लु बेल' फुलझाडांच्या अजून न फुलारलेल्या उभ्या दांड्यावर पडून हेलकावे खात होती; आणि रस्त्याच्या

कडेनं उगवलेल्या रानवट गवतांत, सोनेरी रंगाच्या ‘ हेझल ’ फुलवेलींच्या दाटीखालीं, रस्त्याला अधिक अधिक जवळ येऊन भिडणाऱ्या जंगलाच्या झाडींत—जिकडे तिकडे सूर्यप्रकाश भरला होता, आणि त्यांत जागोजाग ‘ प्रिमरोझ ’ फुलाचे छोटे छोटे ताटवे चकाकत होते. या साऱ्या शोभेकडे ती सारखी पहात राहिली. आपलं लक्ष ट्रॅव्हर्सकडे फारसं नाहीं हें तिच्या लक्षांत आलं नाहीं.

सुमारें पांच मैल गेल्यावर ट्रॅव्हर्सनें गाडी थांबविली. त्यानं तिच्या बाजूची खिडकी बद होती ती उघडली. परंतु बसल्या बसल्याच त्यानं तसं केलं. वसंत ऋतूंतल्या वाऱ्याची नाजुक सुगंधित झुळूक तिच्या अंगावर आली. तिनं समोर पाहिलं तो थोड्याच अंतरावर वाडीचं रुंद पांढऱ्या रगानं रंगविलेलं फाटक तिला दिसलं. त्या पलिकडे फिकट पिवळा रग दिलेल एक घर होतं.

“ एक मिनिटभर ऐक हं. ” ट्रॅव्हर्स तिला म्हणाला, “ ऐकलंस ? ” त्याचं म्हणणं लक्षात न आल्याप्रमाणे तिनं त्याच्याकडे पाहिल.

“ ऐकूं येत नाही तुला ? ” असं विचारून तिच्या गोंधळलेच्या चर्येकडे पाहून तो हसला. मग तो म्हणत होता तो आवाज तिला ऐकूं आला. तो ऐकूं येताच तिन मान पुरती वर केली आणि पाहिल तो फाटकापुढच्या एका ‘विलो’ वृक्षाच्या सोनेरी फुलाभोवती हजारो मधमाशा घोंघावत असलेल्या तिला दिसल्या. त्या पहात विस्मयाने ती अगदी निश्चल होऊन पहात व ऐकत राहिली. ते पाहून ट्रॅव्हर्सला आनंद झाला. तो तिला म्हणाला, “या माझ्या मधमाशा.” त्यान गाडी पुन्हा सुरू केली आणि ती फाटकांतून आंत गेली तेव्हा त्याच्या तोंडावरचं हास्य लिलिअन्‌ला स्पष्ट दिसलं. फाटकापासून घरापर्यंत गेलेल्या वाटेच्या दुतर्फा जे ‘विलो’ वृक्ष होते त्या प्रत्येकावर मधमाशांचे मोठे मोठे झुपके तिला दिसले; व त्या मधमाशाच संगीत चालू होत तें तिला ऐकूं आलं. एका बाजूला ‘ विलो ’ वृक्षाचे रांगेपलीकडे ‘ चेरी ’ आणि ‘ प्लम ’ झाडांचा एक मोठा माडव होता, त्या खालीं काहीं मेंढ्या आणि पांढरीं शुभ्र कोकरं चरत होती. मेंढ्या चारल्यामुळें गवत कापल्यासारखं दिसत होतं;

आणि त्या गवतावर जिथें जिथें प्लमचं झाड होतं तिथें त्याच्या बुंध्याशीं चकाकणाऱ्या पांढऱ्या पाकळ्यांचा सडा पडला होता !

गाडी घरापुढे थाबली; तेव्हा ट्रॅव्हर्स खालीं उतरला; त्याचवेळीं लिलिअन आपल्या बाजूचं दार उघडून खाली उतरली. 'विलो' वृक्षांच्या फुलाभोंवती चाललेला मधमाशांचा घों असा आवाज या ठिकाणींहि ऐकूं येत होता. तो ऐकत, मान वर उचलल्यासारखी करून, ती जागच्या जागीं उभी राहिली. ट्रॅव्हर्सहि तसाच स्तब्ध उभा राहिला. मग त्यानं तिला विचारलं, "तूं आलीस या बद्दल तुला आनंद होतो ना ?"

तिनं उत्तर दिलं, "होय. फार फार आनंद होतोय."

"आतां घरात जाऊं, चल. माझ्या आईची आणि तुझी ओळख करून देतों." असं म्हणून पाठीकडच्या बाजूनं तो तिच्याकडे येऊं लागला.

तो लंगडत आहे असं तिच्या लक्षात आलं, आणि मग लगेच त्याच्या लंगडण्याचं कारणहि तिला प्रथमच समजलं. तिनं चटकन् त्याच्या पायाकडे पाहिलं, आणि मग जणूं आपली नजर तिकडे गेली नाहीं असं दाखविण्यासाठीं तिनं दुसरीकडे पाहिलं.

ती ट्रॅव्हर्सच्या मागोमाग घरांत गेली खरी परंतु स्वतःच्या गतीची तिला जाणीवच उरली नव्हती. तिला फक्त जमीनीवर त्याच्या लाकडी पायाचा होणारा आवाज ऐकूं येत होता, आणि तो ऐकल्यामुळें तिच्या मनाची उलट काहीं प्रतिक्रिया व्हावी ती मुळींच होत नव्हती. तिला जो आश्चर्याचा धक्का बसला होता त्यांमुळें तिची सारी संवेदनाच नष्ट झाली होती, आणि तिनं जें एकदम तोंड फिरवलं होतं तें तसंच ठेवलं होतं. जणूं मनावर एकदम झालेला असंतोषाचा आघात तिला अजूनहि आठवत होता.

या सुंद मनःस्थितींतून ती भानावर आली तेव्हां ट्रॅव्हर्सची आई तिच्यापुढें उभी होती आणि ती तिच्याशीं हस्तांदोलन करीत होती. ट्रॅव्हर्सची आई फार ठेंगणी होती. ठेंगणेपणामुळें तिला आपली नजर सारखीच उचलून वर ठेवावी लागत होती, व स्वतःविषयीं वाटणारी अनुकंपा हृदयांत कोंडून धरावी लागली कीं जी विषण्णतेची जडता माणसाच्या डोळ्यात दिसते ती तिच्या त्या नजरेंत आदळत होती. आपले हाडकुळे हात कंबरेभोंवतालच्या

फडक्यावर झटकन् पुसून हस्तांदोलनासाठीं तिनं पुढें केले होते. तिच्या चर्येवर चिंतातुरता अस्पष्टपणें दिसत होती. परंतु ती बोलतांना अर्धवट हंसत होती, आणि कोणतंहि वाक्य दोनदां उच्चारण्याची तिला खोड होती असं दिसलं. ती लिलिअन्ला म्हणाली,

" तूं आलीस मला फार आनंद झाला. तूं आलीस फार मला आनंद झाला. हॅरीची तूं मैत्रीण आहेस तूं. हें घर तुझंच आहे; हें घर तुझंच आहे. "

म्हातारीच्या या उद्‌गारावरून आणि नंतरच्या संभाषणावरून लिलिअनला कळून आलं कीं, या मंडळींचा मित्रपरिवार अगदीं थोडा होता. तिला असंहि समजलं की या वाडीवर ही मंडळी राहायला आली त्याला तीन वर्षें झालीं होतीं. परोपरीचे कष्ट करून वाडीवर ज्या ज्या गोष्टींची पैदास करतां येईल तिची करून व त्या गोष्टी शहरात विकून ट्रॅव्हर्स आणि त्याची आई चांगले दिवस यावेत यासाठीं धडपडत होतीं. ट्रॅव्हर्स तिला हॉटेलांत मंगळवारी आणि शुक्रवारीच नियमानं दिसला होता त्याचं खरं कारण आतां तिला कळलं. शिस्तीनं प्रत्येक गोष्ट करावयाचा त्याचा स्वभाव होता म्हणून नव्हे, तर मंगळवार आणि शुक्रवार हे शहरांतल्या बाजाराचे दिवस होते म्हणून तो मोटारींत माल भरून शहराकडे येई. वाडीवर कुठें कुठें कोणकोणतीं पिकें लावलीं होतीं, कोंबड्या, ससे, ' गीज ' इत्यादींचे खुराडे कोठें होते, नांगरणीसाठीं घेवलेलं घोडं कुठं होतं, खताचा सांठा कुठें केला होता, तें सारं ट्रॅव्हर्सनं तिला दाखवलं. तिनं पाहिलं तो ट्रॅव्हर्स झपाझप इकडे तिकडे करीत होता. आपल्या थोट्या पायामुळं आपल्या गतींत बिलकूल वैगुण्य येतां कामा नये अशी जबरदस्त इच्छाशक्ति त्याच्या ठिकाणीं असली पाहिजे. अशा प्रकारें विलक्षण चपळाईनें तो लंगडत असतांना त्याच्याकडे पहाणं नको असं तिला वाटलं. त्याच्या सहवासांत असण्याची तिची इच्छा आश्चर्याच्या धक्यानं फुटून तुटून तिचे बारीक बारीक तुकडे झाले. परंतु त्याच्या चर्येवर आणि आवाजांत जो गोड स्नेहभाव होता त्याचीहि जाणीव तिला सारखी होती. वाडीवरच्या शेती बागायतींतून खूप पैसा काढावा, स्नेही सोबती करावे, एखाद्या

स्त्रीवर प्रेम करावं, त्यासाठीं त्याच्या जीवाची धडपड चालली होती. ती त्याच्या बोलण्याच्या प्रत्येक शब्दांत तिला दिसत होती. आपल्या शरीरांत जणूं कांहीं व्यंग नाहींच अशा भावनेनें त्यानं अनेक स्वप्नं रचलीं होतीं.

त्याच्या लांकडी पायाची हकीकत त्याच्या अगर त्याच्या आईच्या बोलण्यांत येणार याबद्दल तिची खात्री होती. परंतु तो विषय निघाला नाहीं. ट्रॅव्हर्स व त्याची आई यांच्याबरोबर तिनं चहा घेतला. ज्या खोलींत तीं तिघं बसलीं होतीं ती ट्रॅव्हर्सनं स्वतःच्या हातानं सजविली होती. निळसर गुलाबी रंगाचे कागद भिंतीवर चिकटविले होते. एके ठिकाणीं बाजाची पेटी ठेवलेली होती. खोलींत आलेला सूर्यप्रकाश पिवळसर कांचेच्या तुकड्यासारखा भासत होता. आपण जिवलग मित्रांच्या सहवासांत आहों असं वाटावं असं त्या खोलीतलं एकंदर वातावरण होतं. बाहेरच्या बाजू-कडल्या एका खिडकींत 'डॅफोडिल'ची कुंडी होती. तिच्यांतल्या रोपट्यावर-चीं फुलं उन्हानं थोडींशीं सुकून गळलेलीं होतीं. टेबलापाशी तिच्यासमोर बसलेल्या टॅव्हर्सकडे लिलिअन्‌नं पाहिलं तेव्हा त्याचा लाकडी पाय ती अजि-बात विसरून गेली, व हॉटेलात तिचं लक्ष प्रथम त्याच्याकडे गेलं तेव्हां जसा त्याचा चेहरा ममताळू आणि विचारांत गढल्यासारखा तिला दिसला होता, तसाच तो आताहि तिला वाटला.

मात्र तिनं आपल्या मनाशी काही वेळा पूर्वींच निश्चय करून टाकला होता, कीं पुन्हा या ठिकाणी यायच नाही. परत जाण्यासाठीं ती जेव्हां गाडींत बसली तेव्हां ट्रॅव्हर्सनं तिला भेट म्हणून दिलेलं मधाचं भाडं आणि बागेत फुललेल्या ' डॅफोडिल ' फुलाच्या गुच्छ हातात धरून बसल्या बसल्या आपण या स्थळाचा कायमचा निरोप घेत आहोत अशा विचारात तिला बरं वाटल. क्लेशकारक गोष्टीपासून सुटका झाल्याचं समाधान ती अनुभवीत होती.

परंतु आठ दिवसानीं ती परत आली. ट्रॅव्हर्सनं तिला चल म्हटलं, आणि नको म्हणून सागण्याइतक कठोर तिला होता आलं नाहीं आता एप्रिलचा महिना सुरू झाला होता; व डॅफोडिलचीं पुरतीं उमललेलीं फुलं उन्हात डोलत होतीं. वाडीवरून गेलेल्या रहदारीच्या रस्त्याच्या कडेला

डॅफोडिलचे गुच्छ ठेवून विकण्याची नवी कल्पना ट्रॅव्हर्सनं काढलेली होती. त्यामुळें ती ट्रॅव्हर्सबरोबर येऊन पहाते तों त्याची आई रस्त्याच्या कडेला मांडलेल्या एका टेबलाशीं बसली होती. त्या टेबलावर डॅफोडिल फुलांच्या छोट्या छोट्या कुंड्या ठेवलेल्या होत्या आणि एक त्रिकोणी लोखंडी पत्रा जवळच टांगलेला असून 'डॅफोडिल फुलं तीन आण्याला एक गुच्छ' असं त्या पत्र्याच्या दोन्ही बाजूंवर पांढऱ्या रंगानं लिहिलेलं होतं.

रस्त्यानं एखादी मोटार आली कीं टेबलाजवळ वाट पहात बसलेली ट्रॅव्हर्सची आई एक कुंडी उचलून वर करून दाखवी. म्हातारीच्या त्या कृतीकडे पाहातांच आपण या ठिकाणीं पुन्हां न येण्याचा निश्चय केला असूनहि कां आलों तें लिलिअनच्या एकदम लक्षांत आलं. या मंडळीची जगण्यासाठीं जी धडपड चालली होती तिचा स्पर्श आपल्या अंतःकरणाला होऊं न देणं लिलिअनला अशक्य होतं. म्हातारीनं तिला पाहातांच हास्य केलं, आणि पुनः पुन्हां उच्चारलेल्या त्याच त्या शब्दांनीं आपला आनंद व्यक्त केला तेव्हां ती आणि ट्रॅव्हर्स स्नेहाची किती भुकेलीं होतीं तें तिला कळलं. त्या दोघांच्या एकटेपणाची अनुकंपा तिला वाटली होती म्हणून ती पुन्हां परत आली होती.

घरांत जाण्याऐवजीं लिलिअन् म्हातारीला म्हणाली, "फुलं विकण्यांत मी मदत करतें तुम्हांला. मी बसतें तुमच्याजवळ." हॅरी घरात गेला, आणि ती त्याच्या आईजवळ बसून राहिली. दुरून एखादी गाडी येतांना दिसली कीं म्हातारी आणि ती 'डॅफोडिल'च्या कुंड्या उचलून दाखवीत. परंतु गाडी थांबत नसे. एखादी गाडी वेग कमी करून सावकाश जाऊं लागे; परंतु तिच्यांतलीं माणसं क्षणभर 'डॅफोडिल'च्या फुलांकडे, त्या दोघींजणींकडे आणि वाडीवरच्या पिवळ्या घराकडे बघितल्यासारखें करीत, आणि मग गाडी पुढें जाई. सारं वातावरण इतकं विलक्षण शांत होतं कीं शहरात राहाणाऱ्या लिलिअन्ला तें मनाची चलबिचल करणारं वाटल. जिकडून तिकडून फुलांचे आणि सूर्यकिरणांनीं गुळचट झालेल्या गवताचे गंध येत होते. वाडीमागची विस्तीर्ण शेतवाडी सूर्यतापानं झोपीं गेल्यासारखी वाटत होती.

म्हातारी लिलिअनशीं मधून मधून बोलत होती. या बोलण्यांत ट्रॅव्हर्सचा विषय सहजगत्याच निघाला, आणि त्याचा पाय कसा मोडला, त्याला कुठं नोकरी करणं अशक्य झाल्यामुळें म्हातारीनं आपल्या जवळची सारी माया कशी दिली, व मग ही वाडी खरेदी घेऊन इथें शेती बागायती करीत तो व त्याची आई कशी राहूं लागली, ती सारी हकीकत म्हातारीच्या बोलण्यांत हलके हलके बाहेर पडली. शेवटीं ती तोंडावर थोडं हंसूं आणून म्हणाली,

"आतां ठीक चाललंय. पैसे मिळतीलसं वाटतं. मग हॅरीला नवा लाकडी पायहि आणता येईल. सध्यांचा जुना पाय नीट बसत नाहीं; त्याचा त्याला त्रास होतो. नवा पाय घे म्हणून मी त्याला आग्रह करतें पण तो घेत नाहीं. त्याचा स्वभावच असा आहे. आधीं दुसऱ्याचं सुख आणि मग आपलं सुख पहायचं..." म्हातारीचं तें बोलणं ऐकता ऐकतांच लिलिअन एकदम उठून उभी राहिली. लांबवर पसरलेल्या सपाट रस्त्याच्या टोंकाला एक गाडी चकाकलेली तिला दिसली होती. ती उभी राहिली व तिनं आपले ओठ घट्ट दाबले. ही गाडी जर उभी राहिली नाहीं तर हातांतली कुंडी फेकून तिच्यावर मारायची आणि तिला उभं राह्यला भाग पाडायचं असा वैतागाचा विचार तिच्या मनांत आला होता. तिनं 'डॅफोडिल' फुलांची कुंडी उचलली आणि एखादी मशाल डोक्यावर घेऊन हलवावी त्याप्रमाणें ती हलविण्यास तिनं प्रारंभ केला. सळसळणाऱ्या रक्तानं तिचं कपाळ धडपडत होतं, तिचा घसा कढत होता व तिचा उंचावलेला हात देखील थरथरत होता. ज्याचे भयानक परिणाम होतील असं कांहीं तरी कृत्य संतापाच्या भरांत आपण करणार असं तिला वाटलं. पण गाडी आली ती एकदम सावकाश चालूं लागली.

तिला एकदम सुटका झाल्यासारखं वाटलं. आपली इच्छा पूर्ण झाली म्हणून अभिमानहि वाटला, आणि हातांत कुंड्या घेऊन ती गाडीकडे गेली तेव्हां ती हंसत होती. तिला जो विलक्षण हर्ष झाला होता तो तिला त्या क्षणीं कळला नाहीं पण नंतर कळला; आणि तिच्या असंहि लक्षांत

आलं कीं ट्रॅव्हर्स व त्याची म्हातारी आई जी धडपड करीत होती तिच्याशीं आपण एकरूप झालों आहोंत.

उन्हाळ्याचे दिवस एकामागून एक उलटूं लागले तसतशी ती ट्रॅव्हर्सच्या व त्याच्या आईच्या धडपडीशीं अधिकाधिक समरस होत. गेली. जुलै महिना आला तेव्हां बटाट्याच्या वाफ्यांत तांबूस फुलं दिसूं लागलीं, 'रॅास्पबेरीं'ना फळांचा पहिला बहर आला आणि बांबूवर चढविलेल्या त्या वेली हिरव्या चंदेरी पल्लवांनीं व तांबूस तेजदार रानखडयांसारख्या वाटणाऱ्या फळांनीं डंवरून गेल्या. उन्हानं तापलेल्या जमिनींतून धुरळा उठलेला जिकडे तिकडे दिसूं लागला.

शनिवारीं तिसऱ्या प्रहरीं फॅक्टरींतली तिची कचेरी बंद झाली कीं लिलिअन कधीं ट्रॅव्हर्सबरोबर त्याच्या गाडींतून तर कधीं एकटीच 'बस' नं वाडीवर जात असे. प्रथम प्रथम ती फक्त दोनचार घटकाच थांबत असे. पण मग ती रात्रींहि तेथें राहूं लागली आणि नंतर हलके हलके आठवडया-अखेरचे दोन्ही दिवस तिथेंच काढूं लागली. पाणी ओढणं, शेतातलं तण खुरपून काढणं, जमीन उकरणं, रोपटीं लावणं किंवा स्वयंपाकघरांत म्हातारीला मदत करण्यासाठीं बटाटे सोलणं, चहा करणं अशीं कामं कुणी न सागतांच ती करूं लागली. 'रॅास्पबेरी'चा मोसम सुरू झाला तेव्हां फळं खुडून टोपल्यांत भरण्याच्या कामीं ती ट्रॅव्हर्सला मदत करूं लागली. सूर्यास्ताची वेळ झाली कीं स्वतः ती, ट्रॅव्हर्स आणि त्याची आई अशीं तिघेजणं फळं खुडण्याचं काम सुरू करीत; प्रकाशानं उजळेल्या वातावरणांतून दूरच्या चर्चमध्यें संध्याकाळच्या प्रार्थनेच्या वेळीं होणाऱ्या घंटेचे घण्घण् आवाज तिला कांहीं वेळ ऐकूं येत. मग ते आवाज थांबले कीं जिकडे तिकडे इतकी स्तब्धता होत असे, कीं परडयांतल्या भिंतीच्या विटांवर 'थ्रश' पक्षी गोगलगाई पकडण्यासाठीं चोंची मारीत ते आवाज तिला ऐकूं येत. मखमलीसारखी मऊमऊ पिकलेलीं फळं तोडण्याचं त्या तिघांचं काम रात्र पडली तरी चालूंच राही.

एकदा चांदण्यारात्रीं तीं तिघेजणं खूपच वेळ फळं तोडीत राहिलीं. किंचित् पिवळसर चांदण्यांत तीं परिपक्व फळं आणि तीं तोडतांना त्या

तिघांच्या हातावर पडलेले डाग काळसर दिसत होते आणि फळांनीं भरून एकावर एक रचलेल्या बुर्डी टोपल्यांचा ढीग 'पॅगोडा'सारखा (एखाद्या जपानी मंदिरासारखा) भासत होता. अखेर 'बस झालं' असं म्हणून ट्रॅव्हर्सनं मेणकापडाचा एक भला मोठा तुकडा त्या ढिगावर टाकला. ट्रॅव्हर्सची आई म्हणाली, "मी घरांत जाऊन कांहींतरी खायचं करते. तुम्हांला दोघांना फार भूक लागली असेल." ती गेली आणि ट्रॅव्हर्स व लिलिअन दोघंच मागं राहिलीं. सुमारें अर्ध्या तासानंतर तीं दोघं घरांत जाण्यासाठीं शेतांतून चालूं लागलीं. दिशा अगदीं स्तब्ध होत्या, आणि बटाट्यांच्या फुलावर रॅास्पबेरीच्या पानांवर, आणि घराच्या छपरांवर पडलेलं चांदणं चकचकीत शुभ्र साईसारखं भासत होतं! चालतां चालतां ट्रॅव्हर्स एकदम थबकून उभा राहिला. त्यानं आपले दोन्ही हात प्रथम तिच्या खांद्यावर ठेवले, व नंतर तिच्या दोन्ही गालाना स्पर्श केला. किंचित् वर उचललेलं तिचं तोंड चद्रप्रकाशात न्याहाळून पहात तो कांहीं वेळ तसाच उभा राहिला. आणि मग फक्त म्हणाला,

"तूं दमली असशील. मला माहीत आहे, तूं फार दमली आहेस."

ती म्हणाली, "छे छे! दमायला काय झालंय?"

त्याचे हात तिच्या गालावरून खालीं सरकले व अतिशय प्रेमानं आणखी एकदम मायेचा उमाळा आल्याप्रमाणं त्यानं त्या हातांनीं तिच्या खांद्याना स्पर्श केला. तो म्हणाला,

"तूं माझ्याशीं लग्न केव्हां करणार तें मला सांग." आणि लगेच आपले शब्द दुरुस्त करण्यासाठीं तो पुढें म्हणाला, "नाहीं नाहीं, केव्हां करणार तें सांग असं नाहीं माझं म्हणणं; माझ्या विचारण्याचा अर्थ असा कीं करशील काय? तुझी इच्छा आहे काय?"

त्याच्याकडे नव्हे तर त्याच्या पलिकडे पाहिल्याप्रमाणें पहात ती उभी राहिली. काय करावं किंवा काय बोलावं तें तिला कळेना.

"तूं आतांच सांगावंस असं नाहीं माझं म्हणणं—" तो म्हणाला, "आतांच सांगितलं पाहिजेस असं नाहीं,

लिलिअन अगदीं स्तब्ध राहिली. अजूनहि तिच्या तोंडून शब्द बाहेर पडेनात. जिकडे तिकडे भरलेल्या चादण्याकडे शून्य दृष्टीनं पहात ती उभी राहिली.

" मला तूं आवडतेस हें तुला माहित आहे. " तो म्हणाला, " तुझ्या लक्षांत आलंय. आणि तुला मी आवडतों हें मलाहि माहीत आहे. कारण एरवीं तूं आमच्याकडे अशी येत राहिली नसतीस. ज्या अर्थी तूं येत राहिलीस त्या अर्थीं तुला माझ्याविषयीं कांहींतरी वाटत असलं पाहिजे. "

" होय " ती म्हणाली. " मला तुम्ही आवडतां. "

ती अगदीं दमून गेली होती आणि तिच्या मनाचा पुरतासा निश्चय होत नव्हता, या दोन्ही गोष्टी तिच्या आवाजावरून स्पष्ट कळत होत्या. म्हणून तो पुन्हा म्हणाला, " मला आतांच सांग असं माझं म्हणणं नाहीं. तुला आपल्या मनाचा निश्चय करायला वेळ पाहिजे. " मग तो फार प्रयत्नानं आणि घाईघाईनं बोलूं लागला, " तुला चटकन् उत्तरं कां देतां येऊं नयेत तें मला कळतं. कां तें पुरतं मला माहित आहे. म्हणूनच मी आजपर्यंत कांहीं बोललों नाहीं; म्हणूनच तूं आपल्या मनाचा निश्चय केला पाहिजेस असं मी म्हणतों. "

तिनं विचारलं, " आणखी आठ दिवसांनीं तुम्हांला सांगितलं तर चालेल ? "

" हं, चालेल. " ते शब्द त्याच्या तोंडून बाहेर पडले ते एखाद्या यंत्रांतून निघाल्याप्रमाणें, आणि त्याचे हातहि तिच्या खांद्यावरून एकदम खालीं गळले. " चालेल; चालेल; मात्र मला वचन दिलं पाहिजेस. तुझं वचन समजूं मी ? "

" होय. मी वचन देतें. " स्वतःच्या इच्छेविरुद्ध ती म्हणाली, व नंतर तिनं आपली दृष्टि त्याच्यावरून काढली आणि चांदण्यानं उजळलेल्या मोकळ्या शेताकडे ती पाहूं लागली. " पण आतां तुम्ही एकटेच आधीं घरात जा. मी एका मिनिटांत येईन. थोडा वेळ अगदीं एकटं रहावसं मला वाटतं. मग मी घरांत येईन. "

बटाटयांच्या वाफ्यांमधून तो चालत घराकडे गेला, परंतु त्याच्याकडे तिचं लक्ष मुळींच नव्हतं. मात्र अखेर जेव्हां तीहि घरांत जाण्यासाठीं निघाली तेव्हां चंद्रप्रकाशानं उजळल्यामुळें दिसणाऱ्या पायाखालच्या जमिनीकडे तिचे डोळे लागले होते त्यामुळें तो कुठून गेला होता तें तिला दिसलं. बटाटयांच्या वाफ्यांच्या कडेनं जमिनींत ठिकठिकाणीं त्याच्या लाकडी पायानं झालेली काळीं भोकं तिला स्पष्ट दिसलीं.

नंतरच्या आठवडयांत एके दिवशीं एक आश्चर्यकारक गोष्ट घडली. तिनं आपल्या कचेरींतल्या बसायच्या जागेवरून खिडकीबाहेर पाहिलं तों तिसरा प्रहर उलटल्यावर एक तरुण पुरुष रस्त्याच्या समोरच्या बाजूच्या फरसबंद वाटेवरून सारखा येरझारा घालीत होता. कचेरी सुटल्यावर ती बाहेर पडली तेव्हां फिक्या किरमीजी रंगाच्या फॅलनेलचा उत्तमपैकीं सूट घातलेला तो तरुण पुरुष तिच्या जवळ आला व आपल्या डोक्यावरची टोपी उचलून त्यानं तिला अभिवादन केलं. तो ऑस्टिन आहे हें तिच्या लक्षात आल्यावर तिला आश्चर्य वाटलं; ती म्हणाली, "मी तुम्हांला ओळखलं नाहीं, खरंच!"

ऑस्टिन फारच बदलला होता. त्याचा चेहरा आतां चोपल्यासारखा दिसत नव्हता किंवा त्यावर पुरळहि नव्हतं. त्यानं जेव्हां तिच्याकडे पुरतं पाहिलं तेव्हां तिच्या लक्षांत आलं कीं त्याच्या चर्येतला पूर्वींचा घाबरटपणा पार नाहींसा झाला होता.

तिनं विचारलं, "इतके दिवस तुम्ही कुठें गेला होता?" "मी आत विम्याचा धंदा करतों." त्यानं सांगितलं, "मला खेड्यापाडयांत हिंडाव लागतं. सारा प्रवास मी बहुधा सायकलवर करतों. व्यायाम घ्या म्हणून तुम्ही सांगितलं होतं ना? तें अगदीं बरोबर होतं. त्यानं माझा फा फायदा झाला."

उन्हांतून तीं दोघं बरोबर चाललीं होतीं. ऑस्टिनच्या पायांकडे त सारखं पहात होती तें प्रथम तिच्या लक्षांत आलं नाहीं. पण जेव्ह आलं तेव्हां त्याचं कारणहि तिचं तिला समजलं.

ऑस्टिननं विचारलं, "माझ्या पायांतल्या बुटांत कांहीं चुक आहे काय?"

" छे, छे ! " ती म्हणाली; " मी आपली सहज पहात होतें व ते किती चांगले आहेत असं मनाशीं म्हणत होतें. " मात्र मनांतल्या मनांत तिच्या लक्षांत आलं होतं कीं ती त्याच्या पायांकडे पहात राहिली होती याचं खरं कारण ज्याचे दोन्ही पाय शाबूत आहेत अशा पुरुषाबरोबर चालण्यांत तिला एक प्रकारचा नवीनपणा वाटत होता हें होत. पुरुषाची शरीरप्रकृति सुदृढ असली नसली तरी स्त्रीच्या प्रेमावर त्याचा कांहीं परिणाम होणं शक्य नाहीं असा जो विचार मागं एकदां तिच्या मनात आला होता त्याची तिला आठवण झाली.

ऑस्टिन म्हणाला, " मला तुम्हांला विचारायचं आहे. माझ्याबरोबर पुन्हा तुम्ही याल काय ? "

" अं...कोण जाणे...? "

" उगीच कधींमधीं, समजा, आठवड्याच्या अखेरीस...? "

" पाहूं या. "

" उगीच कधींमधीं. मला, अजूनहि तुमचं वेड आहे. येईन असं म्हणा अधून मधून. "

ती म्हणाली, " तुम्ही माझ्या नादीं लागूं नका. दुसऱ्या एखाद्या मुलीचा सहवास तुम्हांला अधिक सुखाचा होईल. "

" छे ! होणार नाहीं. "

ती म्हणाली, " बरं पण आतां मला जायला पाहिजे. खरंच जायला पाहिजे. "

ऑस्टिनच्या या भेटीमुळें तिच्या मनावर फार खोल परिणाम झाला व तो बरेच दिवस तसाच राहिला. एखाद्या पुरुषाच्या आवाजाचा नव्हे किंवा त्याच्या रूपाचा नव्हे अगर त्याच्या बोलण्याचाहि नव्हे, तर इतर सगळ्या पुरुषांप्रमाणें त्याला दोन पाय आहेत या साध्या गोष्टीचा मनावर इतका परिणाम व्हावा याचा तिला सारखा चमत्कार वाटत होता. परंतु तो परिणाम झाला होता खरा. पुरुष चालतांना दिसले कीं त्यांच्या पायांकडे पाहावं, असा चाळा ती करीत राहिली.

ऑस्टिनवर तिचं प्रेम नव्हतं. हें तिला स्पष्ट कळत होतं. परंतु दोन पाय असणं या गोष्टीला केवढं महत्त्व होतं तें त्याच्या भेटीमुळं तिच्या एकदम लक्षांत आलं होतं. व तेवढ्यापुरती तिला ऑस्टिनविषयीं कृतज्ञता वाटत होती. तिनं पाहिलं तों पायांच्या किती तऱ्हा होत्या ! कांहीं पुरुषांचे पाय भले मोठे होते. कांहींचे चपटे होते, कांहींचे जड होते, कांहींचें थकल्या-सारखे दिसत, कांहीं पुरुषांचे पाय बारीक आणि नाजुक होते व त्यांची गति चपल होती. पुरुषांच्या स्वभावांतला हट्ट, दुराग्रह, लोभ, भांडखोरपणा, या गोष्टी पायांच्या ठेवणींत व्यक्त झालेल्या असतात असं तिला आढळून आलं. पुरुषांच्या पायांत कांहीं विलक्षणच सौंदर्य असतं असा तिला प्रत्यय आला. पण मग तिला ट्रॅव्हर्सची आठवण झाली. आणि तिला एकदम वाटलं, अरेरे, पुरुषाच्या पायांत जशी शोभा असते तसाच भेसूरपणा असूं शकतो.

त्या नंतरच्या शनिवारीं ती ट्रॅव्हर्सच्या वाडीवर गेली. तिला न्यायसाठीं ट्रॅव्हर्स आला नव्हता. कारण ' मी एकटी बसनं येईन ' असं तिनं त्याला लिहिलं होतं. ती रस्त्यानें चालूं लागली तेव्हा तिसऱ्या प्रहरच्या उन्हाची झळ तिला चांगली जाणवूं लागली. मांडवाखालीं नेहमीं चरणाऱ्या मेंढ्या सावली हवी म्हणून कुंपणापाशीं येऊन एकमेकींना खेटून पडल्या होत्या. ' विलो ' झाडांचीं पिवळीं गुंडाळलेलीं पानं वाटेवर पडलीं होतीं. पुढच्या अंगणांत आणि बाजूच्या शेतांत सामसूम होतं. घराचं दार उघडं होतं. तिनं आत प्रवेश केला आणि घामानं ओले झालेले आपले हातमोजे काढले. तिच्या पिंगट डोळ्यांची नजर नेहमीं आर्जवी आणि उल्हसित दिसायची, पण यावेळीं त्या नजरेंत एकप्रकारचा सुंदपणा आणि कशापासून तरी स्वतः बचाव केला पाहिजे असा भाव आला होता. काय बोलायचं आणि कसं वागायचं याबद्दल तिचा निश्चय झाला होता. नेहमींप्रमाणें आज तिनं सूटकेस आणली नव्हती. तिच्या हातांत फक्त तिचे हातमोजे होते.

ती आंतल्या खोलींत गेली. तिथेंहि कोणी नव्हते. बाजाच्या पेटीपुढच्या लहानशा स्टुलावर ती क्षणभर टेकली, व आपल्या हातमोजांशीं चाळवा-चाळव करीत राहिली. टेबलावर एक चहाचा रिकामा पेला तिला दिसला. जुन्या धर्तीच्या कोचावर वर्तमानपत्राचें कागद पडलेले होते. तिरप्या नजरेनं

त्याकडे पाहून मोठ्या टाइपांतले मथळे सुंदपणानं वाचीत ती थोडा वेळ तशीच बसली. मग अखेर तिनं वर्तमानपत्राचे ते कागद उचलले, आणि ते करतांच ती एकदम भयंकर चपापली. कारण त्या वर्तमानपत्राखालीं ट्र्व्हर्सचा लांकडी पाय पडलेला तिला दिसला. कांहीं वेळ त्याचा शीण नको म्हणून ट्र्व्हर्सनं तो काढून तिथं टाकला असावा.

तिला एकदम गलबलल्यासारखं झालं. कशाची तरी भयंकर भीति वाटली. ती एकदम उठली आणि बाहेर उन्हांत आली. आपण उठून बाहेर आलों याची खरी म्हणजे तिला जाणीव नव्हती. पण तितक्यांत आंतल्या निजण्याच्या खोलीच्या खिडकींतून ट्र्व्हर्सचा आवाज तिच्या कानीं आला.

" हॅलो ! आलीस वाटतं ? आई झोपली आहे. मी एका मिनिटांत खालीं येतो. " तिला पाहिल्यामुळें त्याला जो विलक्षण आनंद झाला होता तो त्याच्या आवाजांत स्पष्ट भरला होता. " तूं उन्हांत उभी राहूं नकोस आलोंच मी. "

शून्यपणानं घराला वळसा घालून ती रॅास्पबेरीच्या शेतात गेली. तिच्या मनातलं दुःख सारखं वाढत होतं. तिनं पाहिलं तो सूर्याच्या प्रखर तापानं रॅास्पबेरीचं सारं शेत जवळ जवळ करपून गेलं होतं. वेलींचीं पानं कड-कडीत झालीं होतीं, आणि फळं काळवंडून फुटलीं होतीं.

ती तशी उभी असतांनाच ट्र्व्हर्स घरांतून तिच्याकडे आला. ती आली म्हणून त्याला हर्ष झाला होता आणि तो झपाझप उडया मारीत होता. निश्चेष्ट मनानं ती त्याच्याकडे पहात राहिली.

" मी थोडीशी झोप घेत होतों. " तो म्हणाला. तितक्यांत त्याचं लक्ष तिच्या रिकाम्या हातांकडे गेले व त्यानं विचारलं, " तूं आपली सूटकेस कुठं ठेवली आहेस ? पुढच्या खोलींत मला दिसली नाहीं. "

ती अगदीं स्तब्ध उभी राहिली. ती म्हणाली, " मी आणली नाहीं. "

" आणली नाहींस ? "

" नाहीं. "

जणूं एकदम तोल गेल्याप्रमाणें कलंडतां कलंडतां सांवरण्यासाठीं त्यानं हालचाल केली.

"तूं राहाणार नाहींस?" त्यान विचारलं. त्याचे डोळे दुःखानं थरथरूं लागले.

"नाहीं." तिनं उत्तर दिलं, "मी राहाणार नाहीं. मी आतां पुन्हां कधीं येणार नाहीं."

"आठ दिवसापूर्वीं आपण जें बोललो...तुला तें अशक्य आहे होय?" तो म्हणाला.

"होय."

"तुला काय वाटतं तें मी ओळखूं शकतों." तो बोलूं लागला; "परंतु तूं जर—"

"मला तें अशक्य आहे." ती म्हणाली, "एवढंच, मला तें अशक्य आहे."

तिला वाटलं आपल्याला आता रडूं येणार, हें सारं कायमचं संपविलंच पाहिजे. ती शेतांतून जाऊं लागली. पण ती दहाबारा यार्ड गेली तोंच तिला वाटलं—ट्रॅव्हर्स मोठ्यांदा कांहींतरी बोलतो आहे.

"तुला काय वाटतं तें मला माहित आहे." तो तिला म्हणत होता "मला माहित आहे–पण मग तूं कां येत होतीस? तुझ्या मनांत जर कांहीं नव्हतं तर येत राहिलीस कशासाठीं? कां? कशासाठीं येत राहिलीस?"

हें ऐकल्यावर तिचं पाऊल पुढें पडेना. ती थांबली आणि हलकेच वळली. प्रखर सूर्यप्रकाशांत सुकून गेलेल्या वेलींच्या पार्श्वभूमीवर त्याची आकृति तिला दिसली. हवेंतल्या उष्णतेनं आणि अंतःकरणांतल्या दुःखानं निश्चेष्ट झाल्याप्रमाणें तो जागच्या जागीं उभा होता. त्याचे मोठमोठे हात गळून पडल्यासारखे त्याच्या दोन्ही बाजूस टेकले होते. त्याला तशा अवस्थेंत पहात ती आणखी एक क्षणच थांबली. मग ती एकदम त्याच्याकडे धावली.

आसवांचं पाणी तिच्या डोळ्यांत खूपून बाहेर पडत होतं, आणि त्याच्या जवळ जाऊन जेव्हां तिनं आपल्या हातांनीं त्याच्या दंडावर व खांद्यावर जोरजोरानं थोपटलं तेव्हां अनुकंपेचा हुंदका तिच्या तोंडून बाहेर पडला. ती म्हणाली, "मी कबूल केलं आहे. मी तयार आहें. माझं तुझ्यावर प्रेम आहे! माझं तुझ्यावर प्रेम आहे! माझ्यावर विश्वास ठेव. माझं खरंच तुझ्यावर प्रेम आहे. आतां माझ्यावर विश्वास ठेव!" (अनुवादित.)



# डाग : ८

बाहेरच्या आंगणांतून 'गजे!' अशी हाक तिच्या कानांवर आली तेव्हां मागच्या परड्यांतल्या पायरीवर बसलेली गजरा आपल्या विचारांच्या तंद्रींतून भानावर आली. ज्या विचारांच्या तंद्रींत दोन घटका डाव्या मांडी-वर उभ्या धरलेल्या हाताच्या तळव्यावर डावा गाल टेकून ती बसली होती, ते विचार तिला सुखाचे वाटण्यासारखे मुळींच नव्हते. परंतु अंतःकरणाला अतिशय खिन्नता देणारे ते विचार करणं तिला भाग होतं. आणि म्हणूनच ते विचार एकदां नीटपणें करण्यासाठीं गजरा स्वयंपाकघराच्या मागच्या दारीं येऊन पायरीवर बसली होती.

कोकणांतल्या कोणत्याहि लहानशा घराच्या मागचं परडं शोभिवंत होतं. तिसरा प्रहर टळून गेल्यामुळें नारळीच्या उंच उंच झाडांच्या आडव्या काळ्या सावल्या स्वच्छ सारवलेल्या ताबूस जमिनीवर पडल्या होत्या. झाडांच्या फटीफटींतून शिरलेली सूर्याची किंचित् तांबूस होऊं लागलेलीं किरणं नारळींच्या खोडांवर आणि परड्यांतल्या छोट्या छोट्या वेलींच्या नाजूक पानांवर आणि फुलांवर तळपत होतीं. संध्याकाळचा वारा हलके हलके सुरू होऊं लागल्यामुळें उंच नारळीच्या माथ्यांना मंद हेलकावे बसून त्यांच्या झुपकेदार शाखा सळसळत होत्या. परंतु या शोभेकडे गजराचं लक्ष नव्हतं. ती आपल्याच उदास विचारांत गर्क होती. मधून मधून तिची नजर वर उचलली जाई, परंतु तिची ती वर झालेली नजर समोरच्या दृश्याकडे जाण्याऐवजीं परड्याच्या उजव्या अंगाच्या भिंतीच्या जरा वरच्या बाजूस देसाई सावकारांच्या मोठ्या वाड्याची मागची माडीची

गॅलरी होती त्या गॅलरीकडे कांहींशा चोरटेपणानं वळत असे, कारण गजराच्या मनांतल्या उदास विचारांचा त्या गॅलरीशीं संबंध होता. गंगाधर देसाई गॅलरींत उभा असलेला कदाचित् दिसेल अशी तिला थोडीशी आशा होती. तो दिसेल तर आपल्याला खुणेनं त्याला कांहीं सांगतां येईल अशा हिशोबांत ती पायरीवर येऊन बसली होती. एकीकडे घरांत अकस्मात् उत्पन्न झालेल्या नव्या परिस्थितीचा विचार ती करीत होती, व दुसरीकडे गंगाधर दिसतो काय म्हणून ती मधूनच हळूंच गॅलरीकडे पहात होती. तिथें तो दिसला नाहीं कीं तिच्या मनाला अधिकच उदासपणा वाटूं लागे. तिला वाटे या बसण्यांत आणि या वाट पहाण्यांत कांहीं एक अर्थ नाहीं, उठावं आणि आंत जाऊन घरकामाला लागावं. परंतु ती असं मनाशीं म्हणाली तरी तिथून प्रत्यक्ष उठणं तिच्या जिवावर येई. ती तशीच बसून राही. ' आतां पुढें माझं कसं होणार ? ' हा विचार नाना रूपांनीं तिच्या मनांत पुन्हां घिरट्या घालू लागे. व पुन्हां ती मोठ्या आशेनं गॅलरीकडे नजर फिरवी.

गॅलरींत गंगाधर दिसला नाहीं कीं तिच्या अंतःकरणाला तर निराशेची धार बोचेच, परंतु तिच्या सबंध शरीराला कसल्यातरी दुःखाची असह्य संवेदना होई. अतिशय भूक लागलेली असली आणि खायला कांहीं मिळालं नाहीं की पोटांत जशी कालवाकालव होते तशी आपल्या सर्व गात्रांची कालवाकालव होत आहे असा चमत्कारिक अनुभव गजराला येई व तो अनुभव तिला प्रथमच येत असल्यामुळें ती भांबावून जाई. मग तिला आठवण होई कीं, गंगाधरनं जेव्हां तिला प्रथम आपल्या मिठींत घट्ट धरलं होतं, व तिचे मुके घेतले होते त्यावेळेस ज्या लहरी तिच्या अंगांगांतून निघाल्या होत्या त्याहि अनुभवतांना ती अशीच गांगरून गेली होती. गेल्या दोन दिवसांत गंगाधरची व तिची एकांती भेट न झाल्यामुळें आज गंगाधरचा विचार मनांत आल्याबरोबर तिच्या शरीरांत वासनेची जी लहर सळसळे ती ज्याप्रमाणें ती अनुभवीत होती त्याप्रमाणें गंगाधरानं तिला प्रथम जवळ ओढून घेतलं त्यावेळेस सुखाचे रोमांचहि तिनें प्रथमच अनुभविले होते. त्या रोमांचांनीं ती अगदीं घाबरून गेली होती व तिला क्षणभर वाटलं

होतं गंगाधरला दूर लोटावं, आणि पळून जावं. पण तसं तिनं केलं नव्हतं. उलट " उद्यां मी असाच यावेळीं येईन. दार उघडं ठेव. " असं जेव्हां गंगाधर म्हणाला होता तेव्हां उत्तराचे शब्द जरी तिच्या तोंडून निघाले नव्हते तरीं त्याला अधिकच बिलगून त्याच्या नजरेला नजर लावून ती हंसली होती. दुसऱ्या दिवशीं गंगाधर आला होता. तिसऱ्या प्रहरची त्यांची ती भेट रोज होऊं लागली होती. भेटीच्या त्या वेळेकडे गजरा डोळे लावून बसूं लागली होती. भेटीच्या त्यावेळेसाठीच बाकीच्या घटका ती मोजूं लागली होती. त्या भेटीच्या सुखासाठीच आपण जगत आहोंत असं तिला वाटूं लागलं होतं. त्या एका सुखाव्यतिरिक्त बाकीच्या कोणत्याहि गोष्टीची तिला आठवणदेखील राहिली नव्हती. मग विवेक तर दूरच...

मालवणपासून सात आठ मैलाच्या अंतरावर सांखळी नांवाचं जें छोटंसं गांव आहे तिथे देसाई सावकारांचा मोठा वाडा आहे. या वाडयाच्या उजव्या अंगाला लागून दादू चव्हाणांचं छोटंसं घर होत. दादूची घरधनीण पांच वर्षांखालीं वारली होती. त्याचा वीस वर्षांचा मुलगा यशवंत मुंबईस गिरणींत होता. गजरा ही यशवंताच्या पाठीवर तीन वर्षांनीं झालेली दादूची मुलगी. दादू सकाळी न्याहरी करून भाकरी घेऊन शेतावर गेला कीं दिवसभर गजरा एकटीच घरांत असे. ती मागच्या परडयात काम करीत असली कीं देसाई सावकाराचा गगाधर तिच्याकडे टक लावून पहात राही. गंगाधर आपल्याकडे पहात असेल अशी गजराला कितीतरी दिवस कल्पनासुद्धां नव्हती. पण एके दिवशीं तिनं सहज मान वर करून पाहिलं तों गंगाधर आपल्याकडे पहात आहे अस तिला वाटलं, आणि कां कोण जाणे, तिला एकदम हसूं आलं. मग ती दोघं मुद्दाम योजून एकमेकांकडे पाहूं व हंसूं लागलीं. पुढें एके दिवशीं तिसऱ्या प्रहरीं गंगाधर अकस्मात् तिच्या घरीं आला व स्वयंपाक घरांत शिरून तिच्यापुढें उभा राहिला. तिनं एकदम आश्चर्यानं व भीतीनं विचारलं, " हें काय? " त्यानं तिला झटकन् ओढून जवळ घेतलं, " गजरे ! " असं हलकेच म्हणून तिचा मुका घेतला, व आणखी पटापट मुके घेतल्यावर आपले दोन्ही हात अतिशय प्रेमानं तिच्या तोंडावरून फिरविले. यानंतर त्या दोघांची भेट म्हणजे नित्याचा क्रम

होऊन बसला. गंगाधर न चुकतां तिच्याकडे येई. तिच्या स्वाधीन होई. य प्रकारांतून पुढें काय निष्पन्न निघणार आहे याचा विचार गजरानं कधीं केल नाहीं. ऐन वयांत येऊं लागलेली एका शेतकऱ्याची साधीभोळी मुलगी होती ती. देसाई सावकारांचा कर्ता सवरता मुलगा आपल्यावर प्रेम करते एवढ्या गोष्टीचा आनंद तिला इतका पुरेसा वाटत होता कीं त्या प्रेमाचे पुढे कोणते परिणाम होणार आहेत याबद्दलची चिंता तिच्या मनाला कधीं शिव लीच नाहीं. जे आज होत आहे तें नेहमींच होणार आहे असं गंगाधराच्य प्रेमात पुरतीच्च सापडलेली भोळी गजरा गृहीत धरून चालली होती. तिल वाटे आपला बाप नेहमीं असाच्च शेतावर जाईल. आपला भाऊ यशवंत नेहमीं असाच दूर मुंबईत असेल. तिसऱ्या प्रहरीं स्वयंपाकघराचें दार लोटून गंगाधर नेहमीं असाच आत येईल. आणि तो नेहमीं असाच आपल्याला प्रेमाच्या सुखांत बुडवून टाकील. या क्रमांत कधीं कांहीं अडचण निर्माण होईल अशी शंका प्रेमानें वेड्या झालेल्या तिच्या मनाला कधीं देखील आली नव्हती....

परंतु दोन दिवसांपूर्वी यशवंत अकस्मात् मुंबईहून घरीं आला होता मुंबईत हिंदु–मुसलमानांचे दंगे उसळले होते. लोक एकमेकाना खुशाल सुरे चालवून ठार करूं लागले होते. पुष्कळ गिरणीकामगार कोंकणांतल्य आपापल्या गांवीं परत आले होते. यशवंतहि त्यांच्याप्रमाणें घरीं आला 'तू घरी निघून ये.' अशी दादूनं त्याला पत्रंहि पाठविलीं होतीं. कारण त्याचं आणि गजराचं अशीं दोन्हीं लग्नं उरकून टाकावींत असं दादूच्य मनानं घेतलं होतं. सांखळी गांवापासून आठ मैलांच्या अंतराबर असलेल्य एका कुटुंबाशीं सोयरीक जोडण्याचा त्यानं बेत केला होता. त्या कुटुंबांतल मुलगी यशवंताला करून घ्यावी व त्यांच्याच एका मुलाला गजरा द्यावी अस त्यानं योजलं होतं. त्यामुळें यशवंत घरीं आला हें पाहून दादूला फार आनंद झाला होता. तो यशवंताला म्हणाला होता, "आपुन आतां दोन दिवसांनं त्येंच्या घरीं जाऊं. तूं मुलगी बघ, मग एकदां गजराबी त्या लोकास्नी दावूं जुळलं तर दोन्हीबी लग्नं करून टाकूं. म्हंजे मी मोकळा झालों." बाप लेकांच्या त्या बोलण्यानं गजरा एकदम भयभीत झाली होती, तिच्या मनां

आलं होतं, माझं लगीन होणार ? म्हणजे मला येथून दुसरीकडे जावं लाग-णार ? गंगाधरची व माझी ताटातूट होणार ? हे मी कसं सहन करूं ? छे छे, हें असलं कांहीं होतां कामा नये....तिन मनाशी बेत केला होता कीं आतां गंगाधर एकांतीं भेटला की त्याला सांगायचं, कीं काय वाटेल तें कर, पण मला तुझ्यापासून दूर जावं लागेल असं कांहीं घडूं देऊं नकोस....

परंतु गेल्या दोन दिवसांत यशवंत सारखा घरींच असल्यामुळे गंगाधरची व तिची नित्याची ठरलेली भेट होऊंच शकली नव्हती. आणि अधिक दुर्दैवाची गोष्ट ही कीं, तिची व त्याची दुरून नजरानजरसुद्धां होऊं शकली नव्हती. दादूच्या बोलण्यांत सहज आलेल्या उल्लेखावरून गजराला एवढंच कळलं होतं कीं गंगाधर कांहीं कामासाठीं मुंबईस गेला आहे. पण हें समजल्यावरहि गजराच्या मनांत येई, गंगाधर मुंबईस गेला असला तरी एक दिवसाच्यावर तो तिकडे राहणार नाहीं. कधीं कधीं त्याला मुंबईस जावं लागतं, पण तो माझ्यासाठी परत येतो. तेव्हा आतांहि तो तसाच परत येईल. माझी एकांतीं भेट घेण्यासारखी परिस्थिती नाहीं हें पाहिल्यावर तो मुद्दाम मागच्या गॅलरींत येऊन उभा राहील व नजरेनें कांहीं सांगेल. कदाचित् आसपास कुणी नाहींसं पाहून तो मला गॅलरीलगतच्या भिंतीपाशीं बोलावील व हलक्या आवाजांत माझ्याशीं बोलेल. तो कांहींतरी युक्ति काढून कुठलीतरी भेटीची जागा योजील. त्या ठिकाणी त्याची गाठ पडल्यावर मी त्याला बिलगून त्याच्या खांद्यावर डोकं टेकीन, व त्याला म्हणेन, ' गंगाधर, मला तुझ्यापासून दूर जावं लागेल असं कांहीं घडूं देऊं नकोस......'

परंतु तिच्या धास्तावलेल्या मनाला धीर देणारा हा तिचा बेत खोटा ठरला होता. गंगाधर मुंबईला गेला. त्याला दोन दिवस होऊन गेले होते. आतां तरी तो घरीं आला असेल व आपल्यासाठीं तो गॅलरींत येईल अशा आशेनं ती आज दोन घटका स्वयंपाकघराच्या मागच्या पायरीवर बसून राहिली होती. आतां माझं कसं होणार या विचाराचं चक्र तिच्या डोक्यात फिरत होतं, व तिची नजर गंगाधर दिसतो काय म्हणून त्याच्या गॅलरीकडे वळत होती. तो दिसला नाहीं कीं तिच्या मनाला एखाद्या शस्त्राच्या धारे-

प्रमाणें निराशा जखम करीत होती, पण त्याच्याबरोबरच कसल्यातरी भुकेच्या तीव्रतेनं तिच्या गात्रागात्रांतून दुःखाची कळ उठत होती. सबंध शरीराची ही कालवाकालव तिनं पूर्वी कधीं अनुभवली नव्हती. त्यामुळें ती सहन करतांना ती भांबावून जात होती....

'गजरे!' अशी बापाची हांक बाहेरच्या अंगणांतून ऐकल्याबरोबर गजरा आपल्या विचाराच्या तंद्रींतून भानावर आली. तिनं पुन्हां एकदां गॅलरीकडे नजर टाकली, तिथें गंगाधर दिसला नाहीं तेव्हां एक सुस्कारा सोडला आणि उठून घरांत शिरत ती ओरडली, "आल्यें, आल्यें!"

रोजच्या क्रमाप्रमाणें बापाला ग्यायसाठीं दुधाचं भाडं ती भरूं लागली तेव्हां बाहेरच्या पडवीच्या बाजूनं कुणीतरी परक्या माणसाचा शब्द तिला ऐकूं आला. ती हळूंच पुढें झाली आणि अर्धवट लोटलेल्या दाराच्या आडून तिनं बाहेर नजर टाकली. मग तिनं दुधाच्या एका भांड्याऐवजीं दोन भांडीं तयार केलीं व तीं घेऊन ती बाहेर गेली. तिला पाहतांच तिचा बाप कांबळ्यावर बसलेल्या त्या परक्या इसमाकडे अर्धवट नजर देऊन म्हणाला, "गजरे, ठरलं ग."

ते शब्द ऐकतांच गजराच्या अंतःकरणाला असा कांहीं धसका बसला कीं दोन्ही हातांतून दुधाचीं भांडीं खालीं पडणार असं तिला वाटलं. तिच्या मनांत आलं, यांनीं माझं लग्न ठरविलं कीं काय? या शंकेनं तिच्या मनाचा थरकांप उडून गेला. क्षणमात्र तिच्या कानांना ऐकूं येईना. बापापुढें व त्या पाहुण्यापुढें दुधाचं एक एक भांडं तिनं कसं ठेवलं तें तिचं तिलाच कळलं नाहीं.

"ह्ये आल्याती निरोप घेऊनश्यान." तिचा बाप सांगू लागला, "उद्यां संध्याकाळीं या वक्ताला मी आणखी येशा यांच्यासंगं जाऊं. येशासाठीं मुलगी पाह्यची हाये ती पाहूं. यंच्या घरालाच जेवण करूं. अन् देन्याघेन्याची बोलणीं उरकून परवां सकाळीं सावकाश घरला येऊं. ह्यें ठरलं. मंग चारसहा दिवसांनीं तुला पहायसाठीं यांची मंडळीबी आपल्या घरीं येतील. योगायोग असला तर दोन्हीबी लग्नं होऊन जातील...."

गजराच्या अंतःकरणाची जी भलतीच धडपड सुरूं झाली होती ती हें सारं ऐकून कमी झाली. तिच्या मनांत आलं, आपला बाप ‘ गजरे, ठरलं ग. ’ असं जें म्हणाला तें आपल्या लग्नाबद्दल नव्हे तर ! आपलं लग्न अजून कांहीं पक्कं ठरलेलं नाहीं या विचारानं तिच्या मनाला एकदम इतकं समाधान झालं कीं ते ठरविण्याचा जो बेत तिच्या बापानं बोलून दाखविला तो तिला महत्त्वाचा वाटला नाहीं. ‘ अजून कांहीं संकट प्रत्यक्ष येऊन कोसळलेलं नाहीं. पुढें येण्याचा संभव असेल तर असो बापडा. तो येईल तेव्हां पहातां येईल. तोपर्यंत माझी व गंगाधरची भेट खात्रीनं होईल. आणि तो मला संकटांतून खात्रीनं वांचवील. ’ असा विचार झर्रकन् तिच्या मनांत येऊन गेला, व मग ज्या भयाच्या धक्क्यानें तिचे हात पाय एकदम गळले होते तें भय चटकन् ओसरून गेलं. शिवाय तिच्या बापाच्या बोलण्यांत जी दुसरी गोष्ट आली होती तिच्याकडे तिचं लक्ष एकदम गेलं नाहीं, पण रिकामीं झालेलीं दुधाचीं भांडीं उचलून ती घरांत गेली व पाहुण्यांसाठीं नेहमींच्या जेवणाहून काहीं तरी अधिक केलं पाहिजे म्हणून घाईघाईनं तयारी करूं लागली, तेव्हा बापाच्या बोलण्यांतली ती गोष्ट तिला एकदम आठवली; आणि ती आठवल्याबरोबर जो एक विचार तिच्या मनांत चमकला त्या विचारानं तिच्या सर्वांगावर रोमांच उभे राहिले. कारण त्या विचारांत धाडस होत; व त्या धाडसांतून फार मोठ्या सुखाची निष्पत्ती होणार होती. अंगावर उठलेले रोमांच निवल्यावर कांहींशा शांतपणानं ती त्या धाडसी कल्पनेचा मनानं पाठलाग करीत राहिली..." उद्या या वक्ताला पाव्हण्यासंगं बाबा आणखी येशा गावाला जाणार. म्हजे उद्यांची समदी रात्र मी घरामंदी एकटी असेन, गंगाधर उद्यां आला मात्र पायजे अन् त्येला ही गोष्ट मला सांगतां आली पायजे..." तिनं गंगाधरच्या समागमाचं सुख आजपर्यंत अनेक वेळा घेतलं होतं. परंतु ते नेहमीं तिसऱ्या प्रहरीं, घाईघाईनं. प्रियकराच्या मिठींत सबंध रात्र निर्वेधपणें घालविण्याची संधि आजपर्यंत कधीं तिला मिळाली नव्हती. तसल्या समागमाचं सुख तिनं कधीं घेतलं नव्हतं. त्या सुखाची संधि अकस्मात् आली होती. ती साधेल कीं नाहीं ? गंगाधर आजपर्यंत तरी मुंबईहून परत

येईल कीं नाहीं ? असे प्रश्न तिच्या मनांत वरचेवर येऊं लागले. कधीं न अनुभवलेल्या अशा सुखाच्या अनिश्चित आशेनं तिचे हातपाय कांपूं लागले. एकीकडे जेवण तयार करता करता गांवच्या देवीला तिनं दहा वेळां नवस केला कीं माझा गंगाधर उद्या येईल असं कर, मी तुझी ओटी भरीन.

ती रात्र आणि दुसरा सबंध दिवस गजरानं कसा काढला तें तिचं तिला माहीत. वरचेवर तिला वाटे, आपल्याला रात्रींचं सुख मिळावं म्हणूनच देवानं हा योग जुळवून आणला. पण तिला पुन्हां वाटे, त्याचा काय नेम; आपलं दुर्दैव असं खडतर असेल कीं ही सोन्यासारखी संधी येऊनहि तशीच वाया जाईल. गंगाधर येणार नाहीं. सारीं घरकामं ती व्यवस्थितपणें करीत होती. परंतु खरं म्हणजे तिला कांहीं सुचत नव्हतं. परड्यांत जाऊन गंगाधरच्या मागच्या माडीकडे तिनं कितीदा पाहिलं त्याला तर गणतीच उरली नव्हती. आपला मनोरथ पूर्ण होणार ही कल्पना मनात आली कीं तिचं शरीर थरथरूं लागे. आणि अखेर निराशाच आपल्या वांट्याला येणार कीं काय ही शंका तिच्या मनात उभी राहिली कीं तिचा घसा कोरडा पडे आणि हातपाय जड होत. अखेर तिसऱ्या प्रहरीं गंगाधर गॅलरींत उभा असलेला तिला दिसला, तेव्हा तिला एकदम सुटल्यासारखं वाटलं. मूर्तिमंत सुख पुढें उभं राहिल्यासारखं तिला वाटलं. पण त्या सुखाची एक नवीनच भीति वाटून तिची छाती धडधडूं लागली. तिला वाटलं पंख लावून, भरारी घेऊन त्या गॅलरीत जाऊन गंगाधरला मिठी मारून सागूं काय, " आज रात्रीं माझ्याकडे ये ! " ते तीन शब्द मनात येतांच, तिचं मन म्हणालं, हे काय योजलं आहेस तूं ? इतकी निर्लज्ज कशी झालीस ! जें करायचं म्हणतेस तें बापाला आणि भावाला कळलं म्हणजे त्याना काय वाटेल ! घराच्या नांवाला डाग लावला पोरीनं असं ते म्हणतील. उद्यां तुझं लग्न होणार. आणि आज रात्रीं खुशाल...

परंतु हा विवेक तिनं कागदाच्या कपट्यासारखा चुरगळून दूर फेकून दिला. तिचा बाप व भाऊ आतां दोन घटकांनीं जाणार होते. तिच्या नवसाला देवी पावली होती. गंगाधर आला होता, गॅलरीत उभा असलेला तिला दिसत होता. तिनं कांहीं वेळ त्याच्याकडे पाहिलं. तो हंसला. ती हंसली.

जरा तिथेंच उभा राहा. आंत जाऊं नको—अशा अर्थाची तिनं त्याला खूण केली. मग योग्य संधि साधून अबोलीचीं फुलं काढायच्या निमित्तानं ती परड्यांत कांहीं वेळ घोटाळली. व झटकन् गॅलरीलगतच्या भिंतीपाशीं जाऊन कण्हेरीच्या मोठ्या झाडांच्या आडोशाला उभं राहून तिनं गंगाधरला निरोप सांगितला. गंगाधरच्या हातांत एक गोल लालबुंद सफरचंद होतं. तिचा निरोप ऐकून तो हंसला व हलक्या आवाजांत म्हणाला, "तुझ्यासाठीं काय काय आणलंय मीं मुंबईहून !"

गजरानं विचारलं, "तें हातातलं सफरचंद माझ्यासाठीं आणलंयस का ?"

"हवं कां तुला ? घे."

तो तें अलगद टाकणार होता, पण गजरा म्हणाली, "अंहं, तसं नको मला."

"मग—?"

"तूं थोडसं खा, आणि उष्टं सफरचंद मला दे."

गंगाधरानं त्याप्रमाणें केलं व तें फळ पदरांत लपवून घेऊन गजरा परड्यांतून परत आली. स्वयंपाकघराच्या पायरीवर थबकून तिनं वळून पाहिलं तों गंगाधर तिला खुणेनं विचारीत होता, आतांच उडी टाकून येऊं का ? त्याची ती खूण पाहून गजरा भयंकर घाबरली. एकदम जीभ चावून तिनं आपला उजवा हात तोंडावर ठेवला; डोळे वटारले, 'नको, नको,' अशा अर्थी मान हलविली आणि स्वयंपाकघरात शिरून दार धाडदिशी लावलं. जें सुख आतां तिला खात्रीनं मिळणार होतं त्याची तिला एक नवीनच भीति वाटूं लागली. तिला वाटे, ही सुखाची रात्र निर्विघ्नपणानं पार पडेल कीं नाहीं ? हें सुख मला सोसवेल कीं नाहीं ? मी माझ्यावरचं संकट गंगाधरला सांगितलं तर त्यांतून वाचविण्याचं वचन गंगाधर देईल कीं नाही—मग ती मनाशीं म्हणे, गंगाधर जर मला वाचविणार नसेल तर मी त्याला म्हणेन गंगाधर, मग मला जिवंत ठेवूं नकोस. तुझ्या मिठींतच मला इतकी घट्ट धर कीं माझे प्राणच जावेत. नाहींतर मला विष प्यायला दे. नाहींतर सुरा घेऊन माझी मान कापून टाक. प्रेमाचं सुख घेतां घेतां येणारं मरण किती चांगलं असेल ? पण पण्त्या

तिच्या मनांत येई, छे, छे, मरणाचे विचार आपण काय म्हणून करायचे ? गंगाधर आला. आतां सगळं कांहीं ठीक होईल. मग ती हळूंच पदराखालीं लपविलेलं उष्टं सफरचंद काढी आणि जणूं गंगाधराच्या ओंठावरून आपले ओंठ फिरवीत आहोंत अशी कल्पना करून त्या फळावरून ओंठ फिरवीत, व गंगाधर कधीं कधीं तिच्या ओंठावरून दांत लावीत असे तसे लावून त्या गोड लुसलुशीत फळाचा एक लहान तुकडा तोडून ती तोंडांत घेई.

मध्यरात्र उलटून गेल्यावर थोडयाच वेळानं दादू आणि यशवंत घरीं परत आले. दोघेही अगदीं गप्प होते. दादूनं आपलं मुंडासं काढून पडवींतल्या खुंटीवर अडकविलं. यशवंतानं आपला कोट व गांधी टोपी काढून खुंटीला टांगली. कांबळी अंथरलेली होतींच. दोघांनीं ती नीट केलीं आणि आपलं अंग टाकून दिलं. एका भिंतीच्या लहानशा कोनाडयांत लामण दिवा जळत होता तो मालवून टाकण्याचं भान दोघांनाहि नव्हतं. आंत स्वयंपाकघरांत गजरा निजली असेल, तिला मुद्दाम उठवून लग्नाचीं बोलणीं फिसकटून आम्ही भांडण करून आलों हें आतांच कशाला सांगायचं, असं त्यांच्या मनांत आलं. दोघेहि आपआपल्या मनाशीं वैतागले होते. एकमेकांशीं एकहि शब्द बोलण्याची त्यांना इच्छा नव्हती. थोडया वेळानं म्हाताऱ्याला झोप लागली. यशवंताला मात्र कांहीं केल्या झोप लागेना, मध्येंच घरापुढच्या रस्त्यांतून कुणीतरी बोंबलत गेलं आणि चारसहा माणसं धांवत गेल्याचे आवाज आले. 'वेडा पुरुषा मोकळा सुटलाया' अशा आरोळ्या त्याच्या कानावर आल्या. पण त्यानं तिकडे विशेष लक्ष दिलं नाहीं. गावांतल्या दत्तू सोनाराचा भाऊ पुरुषा वेडा होता. तो मोकळा सुटला कीं वाटेल ते अत्याचार करी, म्हणून त्याला घरांतल्या एका खोलींत बाधून ठेवलेलं असे. तो खोलींतून बाहेर पडून गांवांतून सैरावैरा धांवत सुटला असेल. इतक्या साऱ्या गोष्टी यशवंताच्या मनांत झटकन् येऊन गेल्या.

एरव्हीं कदाचित् तो अंथरुणावरून उठून रस्त्यांत जाऊन पुरुषाचा पाठलाग करणाऱ्या लोकांत सामील झाला असता, परंतु या घटकेला तसं कांहीं करण्याच्या मनःस्थितींत तो नव्हता. तो संतापानं आंतल्या आत

जळत होता. जी मुलगी पहायसाठीं तो बापाबरोबर गेला होता ती त्यानं तात्काळ पसंत केली होती. पण नंतर देण्याघेण्याचीं बोलणीं जेव्हां सुरू झालीं तेव्हां त्या लोकांनीं स्वतःच्या श्रीमंतीच्या आणि खानदानीपणाच्या गोष्टी काढल्या होत्या. दादू चव्हाण बऱ्यापैकीं शेतकरी असला तरी त्याचा दर्जा कमीच अशा आविर्भावाचे उद्‍गार काढले होते आणि यशवंतानं गिरणींतली नोकरी सोडून दुसरी एखादी अधिक प्रतिष्ठेची नोकरी मिळविली तरच या सोयरिकीचा विचार करूं, असं बोलून दाखविलं होतं. तें सारं बोलणं यशवंताला भयंकर असह्य झालं होतं. कोटाच्या खिशांतल्या लांब पात्याच्या चाकूवर त्याच्या सळसळणाऱ्या बोटांची पकड घट्ट झाली होती. चाकू बाहेर काढावा आणि अपमानाचा बदला घ्यावा असा भयंकर विचार त्याच्या मनांत आला होता. असले प्रकार करण्याची मुंबईस त्याला संवयच झाली होती. तिथल्या दंग्याच्या दिवसांत पाच सहा मुसलमान त्यानं आपल्या हातानं ठार केले होते. चाकू उपसणं आणि पाठींत किंवा पोटांत खुपसणं याचं त्याला विशेष कांहीं वाटेनासं झालं होतं. पण अत्याचाराची उसळी त्यानं कशीबशी आवरली होती. तो बापाला एवढंच म्हणाला होता, " यांच्या घरांतलं जेवण नाहीं घ्यायचं. आणखी इथें क्षणभरदेखील थांबायचं नाहीं. चल, जाऊं घराला. " मग बापलेक रातोरात घरीं परत आले होते......

हा सारा प्रकार यशवंताला वरचेवर आठवे व तो आठवल्यावर त्याचं मन आंतल्या आंत जळूं लागे. त्यामुळें त्याला कांहीं केल्या झोंप लागेना. कांहीं वेळानं त्याला फार तहान लागली म्हणून तो उठला व स्वयंपाकघराचं दार ढकलून आंत गेला, " गजरे, मला पाणी दे ग प्यायला. " असं तो म्हणणार होता. परंतु दिव्याच्या अर्धवट उजेडांत त्याला जें दृष्य दिसलं तें पाहिल्याबरोबर त्याचे ते शब्द ओंठावरच्या ओंठावरच थिजले, आणि दोन्हीं हातांनीं आपलं डोकं घट्ट धरून तो पहात राहिला !

कारण गजरा एकटी निजली नव्हती. ती आणि गंगाधर एकमेकाला बिलगून अगदीं गाढ झोंपीं गेलीं होतीं. प्रेमिकांचं तें आलिंगन आणि सुखानंतरची साऱ्या जगाला विसरायला लावणारी ती शांत निर्वेध झोंप हें दृश्य

वास्तविक किती सुंदर ! परंतु त्या दृश्यांत यशवंताच्या दृष्टीला सौंदर्य कसं दिसेल ! मी जें पहातो तें खरें काय ? कीं मला काय भ्रम होत आहे, अशी शंका यशवंताच्या मनांत उगीच क्षणभर आली. आपल्याला जें दिसत आहे तें खरोखरीच आपल्यापुढें आहे ही खात्री पटल्यावर तो डोकं घट्ट धरून व डोळे वटारून वेडयासारखा पहात राहिला. त्याच्या विस्मयाचा पहिला धक्का ओसरल्यावर संतापाची आणि तिटकाऱ्याची लकेर त्याच्या शरीरांत हलकेंच शिरूं लागली. भिंतीवरची त्याची मोठी सांवली वाऱ्याच्या झुळके-बरोबर हेलकावे खात होती. तिकडे त्याची नजर उगीचच गेली, व मग खालीं अंथरुणावर पडलेल्या त्या दोघांकडे पुन्हां वळली. दोन्ही कानशिला-वर धरलेले त्याचे हात संतापानं थरथर कापूं लागले....

तो झटकन् बाहेर गेला व बापाला जाग करून म्हणाला, " आंत स्वयं-पाकघरांत जाऊन बघा." म्हाताऱ्याला त्याचं बोलणं कळेना. पण यशवंतानं त्याला उठवून स्वयंपाकघरांत जवळ जवळ ढकललं. आंत जातांच जें दिसलं तें पाहिल्याबरोबर म्हाताऱ्यानं कंबर खचल्याप्रमाणं एकदम खालीं बैठकच मारली.

तितक्यांत यशवंत पुन्हां आंत आला व तो काय करतोय हें म्हाता-ऱ्याच्या लक्षांत येण्यापूर्वींच त्यानं चाकूचं पातं गंगाधरच्या डाव्या कुशींत खुपसलं ! रक्ताची पहिली जोराची चिळकांडी उडाली ती भिंतीवर पडली. दुसरी चिळकांडी उडाली ती अंथरुण आणि गजरा व गंगाधर यांचीं वस्त्रं यांवर उडाली. वास्तविक गंगाधर तात्काळ मरायचाच. परंतु चाकूचं पातं त्याच्या आंतडयापर्यंत पोंचलं नव्हतं. तो फक्त गाढ झोपेंतून शुद्धीवर आला व 'अः!' एवढाच विव्हळण्याचा उद्गार काढून पुन्हां बेशुद्ध झाला. म्हातारा यशवंताजवळ येऊन म्हणाला, " पोऱ्या ! आरं ह्यें काय केलंस ?" व तो ढसढसा रडूं लागला. गजरा जागी झाली व झटकन् उठून बसली. त्याक्षणीं तिला जें दिसलं तें पाहिल्याबरोबर एकदम तिची वाचाच बसली. ती आणि गंगाधर अशा बेभान अवस्थेंत आणि सकाळपर्यंत आपण एकटींच आहोंत या खात्रीनं निजलीं होतीं कीं दाराला कडी घालायची शुद्धही त्यांना राहिली नव्हती. क्षणापूर्वींच केवढ्या सुखाच्या सागरात ती बुडाली होती ! व आतां

दृष्टीला हें काय दिसत होतं ? तिला वाटलं, गंगाधराच्या गळ्यांत गळा घालावा व मोठ्यांदा हंबरडा फोडावा. तिला असंहि वाटलं कीं ज्याचं पातं रक्तानं निथळत होतं असा तो चाकू भावाच्या हातून घेऊन आपल्या मानेभोंवतीं झर्रकन् फिरवून टाकावा. पण त्यापैकीं कांहींच तिनं केलं नाहीं. बर्फाच्या पेटींत सापडल्याप्रमाणं तिचे हातपाय भीतीनं गारठून निकामी झाले होते. ती फक्त एखाद्या वेड्यापिश्याप्रमाणें आळीपाळीनं बापाकडे, भावाकडे व आपल्या प्रियकराकडे पहात राहिली. तिनं आ वासला होता. तोहि तिला मिटतां येईना.

यशवंताच्या अंगावर खून चढला होता. त्याला कोणताहि विचार सुचणं अशक्यच होतं. सुरी चालवावी. आणि मुदडा पाडला कीं धूम पळत सुटावं अशी मुंबईस त्याला संवय झाली होती. त्या संवयीला अनुसरून तो तेथून ताबडतोब पळाला कसा नाहीं हेंच आश्चर्य ! कदाचित् त्याच्या मनांत त्याक्षणीं जरी कोणताहि स्पष्ट विचार नव्हता तरी आपला म्हातारा बाप आणि बहीण यांना गंगाधराच्या प्रेताजवळ असंच सोडून जाता येणार नाही अशी अन्धुक जाणीव त्याच्या डोळ्यांत कुठें तरी तरळत असेल. आपले लाल डोळे वटारून रक्तानं न्हालेल्या चाकूच्या पात्याकडे बघत आणि आपला श्वास कसा बसा आवरीत, तो एक दोन मिनिटं उभा राहिला. आणि मग त्यानं हातातला चाकू मोरीकडे फेकून दिला. पुन्हां तो कांही वेळ भ्रमिष्टासारखा उभा राहिला. आणि मग जणूं एकदम भानावर आल्याप्रमाणें तो उद्गारला, " आतां पुढें काय करायचं ? "

त्याच्या त्या उद्गारानं म्हाताराहि एकदम शुद्धीवर आला. इतका वेळ तो कंबर खचल्याप्रमाणें ढसढसा रडत होता. परतु यशवंताचा तो उद्गार ऐकल्याबरोबर त्याचं मन त्याला म्हणालं, ' कंबर खचल्याप्रमाणें बसून कसं चालेल ? रडत बसून कसं चालेल ? आतां पहिली गोष्ट केली पाहिजे ती ही कीं येशाचे प्राण वांचविले पाहिजेत ! तो फांसावर जाईल. त्याचा जीव वांचविला पाहिजे......' यशवंताचे दोन्ही खांदे धरून त्याला गदगदा हलवून तो म्हणाला. " असं उभा राहनश्यान कसं भागेल ? झालं त्ये

होऊनश्यान गेलं, त्ये अंगाशीं येणार न्हाई म्हून बिगी बिगी कांहीं तरी कराया व्हांवं—"

यशवताच्या नजरेंत अजूनहि बेभानपणा होता. आपला बाप आपल्याशीं बोलत आहे हें त्याच्या लक्षांत यायला वेळ लागला. मग त्यानं विचारलं,

" काय करायचं म्हणतां ? "

म्हातारा म्हणाला, " सांगतु-पर अगुदर खुळ्यासारखं बगायचं बंद कर. जरा भानावर ये, अन् मी सांगतु त्यापरमानं तुं आनखी गजी घटाचट कराया लागा. ऐकलंस कां पोरी ! "

गजरान मान हलविली, आणि यशवंतानंहि. मग म्हाताऱ्यानं व यशवंतानं मिळून गंगाधरला उचललं, बाहेर आणलं, आणि पडवीला जाळीचा कठडा होता त्याच्या लगत असलेल्या एका बाकावर आडवं ठेवलं. गंगाधर शुद्धींत नव्हता. त्याला आंतून बाहेर आणलं तेव्हां दोनचार ठिकाणीं जमिनीवर रक्त सांडलं. झटकन् ओलं फडकं घेऊन ते डाग पुसून काढायला म्हाताऱ्यानं यशवंताला सांगितलं. आंत स्वयंपाकघरांत जाऊन त्यानं मोरींत पडलेला चाकू उचलला. व मागच्या परड्यांत धांवत जाऊन तो जोरानं लांब भिरकावून दिला. तो कुठं जाऊन पडतो याची त्याक्षणीं त्याला फिकिर नव्हती. स्वयंपाकघरांत परतल्यावर त्यानं गजराला सांगितलं, " तुझ्या अंगावरचीं चिरगुटं, अंगाखालची गोधडी, सारं परड्यांत घेऊन जा. अगदीं साफ धुवून टाक, आणखीन मग बिगीबिगी इथली जमीन आणखी जिथें रक्ताची चिळकांडी आहे ती भिंत शेणानं सारवून साफ कर. " हें सारं काम त्यानं आपल्या देखरेखीखाली गजराकडून करून घेतलं.

मग तो बाहेर आला. त्याच सुमारास रस्त्यांत मोठा गलका झाला. " वेडा पुरुषा पळाला, " " वेडा पुरुषा पळाला. " अशा आरोळ्या ऐकूं आल्या आणि पांच-दहा लोक रस्त्यांतून धांवत गेले. तें पाहिल्याबरोबर म्हाताऱ्याच्या मनांत कसलीतरी कल्पना एकदम आली. तो रस्त्यावर गेला व त्यानं मोठ्यांदा बोंब ठोकली ! " पुरुषा पळाला. " म्हणून ओरडत पळत गेलेले लोक परत फिरले आणि म्हाताऱ्याभोंवतीं गोळा झाले. म्हाताऱ्यानं

पुन्हां बोंब मारली, आणि मोठमोठ्यांदा रडावयास प्रारंभ केला. लोकांनीं जेव्हां त्याला गदगदा हलवून “ काय झालं साग तरी ” म्हणून विचारलं तेव्हां एकीकडे गळे काढीत तो सागू लागला, “ गंगाधर सावकार कीर्तनाला ग्येला व्हता. तिकडून परत आल्यावरतीं त्येच्या वाडयाचं दार कुनी उघडीना म्हून आमच्या घरामंदी येऊन पडवींतल्या बांकडयावर त्यो झोपला होता. त्येला भोसकून मारून कुणी तरी पळालं, येडया पुरुषानं तर ह्यं केलं नसल ! आई, आई ग ! आतां म्या कसं करूं ? ”

त्याचा विलाप तसाच कांहीं वेळ चालूं होता. भोंवताली गोळा झालेल्या लोकांनीं शेवटीं त्याला हातांनीं धरून घरांत नेलं. आणि पडवींत जाऊन ते पहातात तों खरोखरच बाकड्यावर जखमी गंगाधर बेशुद्धावस्थेंत पडलेला त्यांना दिसला. त्याचा प्राण अजुनहि पुरता गेला नव्हता; परंतु तो कांहीं शुद्धीवर नव्हता. म्हातारा सारखा हेल काढून रडत राहिला. यशवंताहि लोकांना सांगू लागला कीं सावकार इथे येऊन झोपले होते, बाहेरच्या बाजूनं कठड्याच्या जाळीच्या भोकांतून हात घालून कुणीतरी त्यांना भोसकलं असावं....

खुनाची वर्दी मालवणच्या पोलीस ठाण्यावर गेल्यावर एक जमादार आणि दोन शिपाई साखळी गांवाला येऊन दाखल झाले. त्यांनीं पंचनामा वगैरे केला आणि गंगाधराचा जबाब घेतला. त्यानंहि असाच जबाब दिला कीं, “ मी कीर्तनाहून परत आलों. माझं दार मीं पुष्कळ ठोठावलं परंतु कोणी कडी काढीना म्हणून याच्या घरांत येऊन बाकावर झोपलों. कठड्याबाहेरून कुणी तरी एकदम माझ्या पोटांत चाकू खुपसला...” मोठ्या कष्टानं कशीबशी एवढी जबानी त्यानं दिली, आणि नंतर त्यानं अखेरचे डोळे झांकले. मृत्यूच्या क्षणीं त्याला समाधान देणारा विचार होता तो हा, कीं माझ्या आणि गजराच्या नांवावर येऊं पहाणारा डाग मी टाळूं शकलों. म्हाताऱ्यानं बाहेर रस्त्यावर बोंब ठोकून लोकाना जी हकीकत सांगितली ती अर्धवट शुद्धींत त्यानं ऐकली होती, व ती ऐकल्याबरोबर त्यानं मनाशीं ठरविलं होतं, कीं म्हाताऱ्यानं हुशारीनं केलेला हा बनाव चांगला आहे. त्याला आपण चिकटून राहिलं पाहिजे.‘या बनावामुळें आपली अब्रू वाचेल

व विशेष म्हणजे बिचाऱ्या गजराचं जन्माचं नुकसान व्हायचं टळेल. एवीतेवी आता आपण मरणार परंतु आपल्या आणि गजराच्या चारित्र्यावर येऊं पहाणारा डाग आपण चुकवूं शकलो तर आपल्या गजराच्या निःसीम प्रेमाचं सार्थक होईल...हे विचार करीतच तो मृत्यूची वाट पहात राहिला होता. जमादार आला तेव्हां त्यानं मनाशीं आधी योजून ठेवल्याप्रमाणे जबाब देऊन टाकला, व अखेर समाधानानं प्राण सोडला.

जमादारानं वेड्या पुरुषाला पकडलं. त्यानंच तुफान वेडाच्या लहरींत रस्त्यांतून सैरावैरा धांवतां धावतां कठड्याच्या बाहेरून गंगाधरला ठार केलं असलं पाहिजे, अशी त्या एकंदर घटनेची संगति जमादाराला पटली. पुरुषान गंगाधराला का ठार करावं, किंवा तें कृत्य करण्यासाठीं त्याला हत्यार कुठून मिळाल होतं, किंवा खून केल्यावर त्याच्या हातांत ते हत्यार कसं नव्हत, इत्यादि शंकांचीं उत्तरं देण्याचं कारण नव्हतं. कारण ज्याला खुनी म्हणून पकडलं होतं तो मनुष्य बोलून चालून एक माथेफिरू वेडा होता, त्याला नेहमीं खोलीत बाधून घालून ठेवण्यांत येत असे व कधीं काळीं तो मोकळा सुटला कीं तो कुणावर हल्ला चढवून काय करील त्याचा नेम नसे अशी साऱ्या गांवाची साक्ष होती. आपण सारा तपास झटपट पुरा करून खुनी इसमाला पकडून आणण्याची बहादुरी केली याबद्दल वरिष्ठ अधिकारी आपली पाठ थोपटणार खास, अशा आनंदांत जमादार वेड्या पुरुषाला घेऊन परत गेला.

परंतु वरिष्ठ अधिकाऱ्यांनीं त्याची पाठ थोपटली नाहीं. जमादाराची सारी हकीकत त्यानी ऐकून घेतली. पण वेड्या पुरुषानं कठड्याबाहेरून गंगाधरला भोसकलं असावं हा खुलासा त्याच्या मनाला पटेना. गंगाधरच्या शरीराची मरणोत्तर तपासणी करण्यासाठी त्याचं शव पाठविण्याची व्यवस्था जमादारानं केली होती. त्या तपासणीचा निकाल शक्य तितक्या तावडतोब कळेल अशी व्यवस्था करून फौजदार स्वतः अधिक तपासासाठीं साखळी गांवीं दाखल झाले.

तीन चार कॉन्स्टेबलांसह फौजदार दारांत येऊन उभे राहिलेले पहातांच यशवंत आणि त्याचा बाप आश्चर्यानं आणि भीतीनं चांगलेच चपापले.

जमादार वेडया पुरुषाला घेऊन पकडून गेला तेव्हां म्हाताऱ्याला वाटलं होतं आपला बनाव यशस्वी झाला. वेडया पुरुषाचा हकनाक बळी जाणार या कल्पनेनं त्याच पापभीरु मन कांहीं वेळ शरमलं होतं परंतु आपण तो बनाव केला नसता तर आपला पोटचा येशा फांसावर लटकला असता, त्याला वांचविण्यासाठींच हा खोटेपणा आपल्याला करावा लागला त्याला इलाज नाहीं, आणि शिवाय वेडया पुरुषाचा प्राण असा काय कुणाला मोलाचा होता की त्याची मान आपण अडकविली म्हणून आपल्या डोक्या-वर तळतळाट येणार आहे अशा दुहेरी विचारानं त्यानं आपल्या सदसद्-विवेक बुद्धीची रुखरुख दाबून टाकली होती. देवाच्या घरीं आपला अन्याय रुजू होईल या भयापेक्षां आपल्या लेकाचे प्राण आणि लेकीची इभ्रत सुरक्षित ठेवण्यांत आपण यशस्वी झालों असा निर्भयतेचा विचारच त्याच्या मनात अधिक स्थिर झाला होता. येशाच्या मनावरचा खुनी बेहोषपणा अजून पुरता ओसरला नव्हता, तथापि त्याला देखील अशा खात्रीची स्वस्थता वाटत होती कीं आपण सुटलो. गजरा आंत—स्वयंपाकघरांत एका रकट्यावर पडून राहिलेली होती. गंगाधराचा भयंकर अंत एकाएकी झालेला पाहून तिच्या अंतःकरणाचे तुकडे तुकडे झाले होते. आपल्या प्रियकराच्या गोड मिठींत सारं जग विसरून बेभान आनंदानं ती झोपी गेली होती काय ! आणि दचकून उठून ती पहाते तों गंगाधर अत्यंत क्रूरपणानं मारला गेल्याचं दृष्य तिला दिसल होतं काय ! आपल्या भावानं गंगाधराचा खून केला हें ज्याक्षणीं तिच्या ध्यानांत आलं, त्या क्षणापासून गंगाधरचं नाव घेऊन ओर-डावं, ऊर बडवावा, विलाप करावा असा तिच्या जीवाचा आकांत झाला होता; आणि तो सारा आकांत गिळून टाकावा लागल्यामुळें ती आंतल्या आत गुदमरून गेली होती. त्या गुदमरलेल्या स्थितींत ती स्वयंपाकघरांत रकट्यावर पडून राहिली होती.

बाहेरच्या पडवींत जमादारानं पंचनामा केला होता तिकडेहि तिनं लक्ष दिलं नव्हतं. जमादार आपलं काम संपवून कुणाला पकडून घेऊन गेला हेंहि तिला माहित नव्हतं. आपला भाऊ येशा आतां फांसावर जाणार कीं सुटणार याबद्दलचेहि विचार तिच्या मनात आले नव्हते. ती आपलं सर्वस्व

गमावून बसली होती. आणि त्याबद्दलच्या शोकाचा समुद्र तिला आपल्या एवढ्याशा नाजूक गळ्यांत अडकवून ठेवावा लागला होता. बाहेरच्या जगाकडे तिचं लक्ष नव्हतं; आपल्या बापाचं व भावाचं अस्तित्वहि तिच्या ध्यानांत नव्हतं, उजेड अंधार हे फरक तिला कळत नव्हते, काळाची जाणीव तिला उरली नव्हती. तिचा प्राण गेला नव्हता एवढच, बाकी ती रकस्यावर एखाद्या शवासारखी पडून राहिली होती...

त्यामुळ स्वयपाकघराचं दार धाडदिशी लोटलं गेल, फौजदार आंत आला, त्याच्या बुटाचा आवाज झाला, दोन शिपायांनी तिच्या बापाला आणि भावाला धरून आणलेलं तिन पाहिलं, आणि एक शिपाई गॅसची बत्ती घेऊन आंत शिरल्याबरोबर स्वयंपाकघराच्या अंधाऱ्या खोलीत उजेडच उजेड झाला, तेव्हां एकदान मिनिट तिला तो प्रकार कळेनाच. मग तिच्या एवढंच ध्यानांत आल की पोलीस आले आहेत. आणि दिव्याच्या प्रकाशात स्वयंपाकघराचा कोपरान् कोपरा पाहू लागले आहेत. ती गांगरून उठली. ती मोठ्यादा किंकाळी फोडणार होती आणि आपल्या बापाच्या गळ्यांत पडण्यासाठी धावणार होती पण तितक्यांत फौजदारांनी तिला एकदम गच्च धरलं आणि म्हटलं, " ओरडू नकोस. " ती एकदम गप्प झाली.

बाहेरच्या पडवीची पहाणी केल्याबरोबर फौजदारांनी ओळखलं होतं की गगाधर कठड्याला लागून बाकावर निजला होता व कुणीतरी बाहेरून भोसकून त्याला मारलं हें सर्वस्वी खोटं असल पाहिजे. कठड्यावर कुठेहि रक्ताची चिळकांडी उडालेली दिसत नव्हती. लाकडी जाळीची भोकं इतकी अरुद होती की त्यांतून कुणाचा हात आंत शिरकणं अशक्य होतं. आणि गगाधराच्या शवाच्या तपासणीचा रिपोर्ट आला त्यांत तर म्हटलं होतं, त्याला झालेली जखम सात इंच खोल होती. तेव्हा गंगाधराला बाहेरून कुणी तरी भोसकलं हा कुणाचा तरी कांगावा असला पाहिजे याबद्दल वाद नव्हता. अर्थात् गंगाधराचा खून झाला त्या वेळेस तो बाकावर निजला होता ही गोष्ट खोटी असली पाहिजे. ही गोष्ट खोटी तर मग गंगाधर निजला होता कोठे ? या प्रश्नाचा विचार करतां करतां फौजदारांनी एक तर्क मनाशी केला होता. सकाळी गांवांत आल्याबरोबर त्यांनी सावकाराच्या

घरांतल्या माणसांना व शेजाऱ्यापाजाऱ्यांना छेडलं होतं, व त्यांना कळलं होत कीं गंगाधर आणि गजरा यांचे चोरटे प्रेमसंबंध होते. तो आणि गजरा झोपलीं असताना गंगाधराचा खून कुणी तरी केला असला पाहिजे ही कल्पना फौजदारांच्या मनानं पक्की घेतली होती, व ती सिद्ध करतां येईल असं त्यांना वाटूं लागलं होतं. एक गोधडी आणि बरीचशीं चिरगुटं वाकड्या तिकड्या टांगलेल्या दोऱ्यांवर वाळत असलेलीं दिसलीं. ही गोष्ट त्यांना जरा चमत्कारिक वाटली. केमिकल ॲनलायझरकडे पाठविण्यासाठीं त्यांनीं तीं ताब्यांत घेतलीं. जमिनीचा कांहीं भाग सारवलेला दिसला. एका बाजूच्या भिंतीवरहि सारवण्याचा मोठा पट्टा दिसला, ही गोष्टहि त्यांना संशयास्पद वाटली. ज्या ठिकाणीं जमीन आणि भिंत सारवलेली होती तिथलं अजूनहि ओलसर असलेलं सारवण हलक्या हातानं खरवडून घ्यायला त्यांनीं आपल्या माणसांना सांगितलं. ही ओली माती देखील ते केमिकल ॲनलायझरकडे पाठविणार होते. मग त्यांनीं घरांतल्या साऱ्या सामानाची झडती घेतली तेव्हां यशवंताच्या ट्रंकेंत एक भला मोठा चाकू सांपडला. पात्यावर रक्ताचे डाग नव्हते. पण पात्याची लांबी बरोबर सात इंच होती. तोहि फौजदारांनीं ताब्यांत घेतला. मग झडती आणि तपास पुरा करून गजरा, यशवंत आणि म्हातारा यांना अटक करून घेऊन ते परत गेले.

थोडीशी मारहाण केल्याबरोबर गजरानं कबूल केल कीं ती आणि गंगाधर एकमेकाला मिठी मारून निजलेली असतांना त्याचा खून झाला. यशवंतानं कबुली दिली कीं मीं गंगाधरला ठार केलं; माझ्याजवळ दोन चाकू होते, ट्रंकेंत सांपडला तो एक व ज्या चाकूनं गंगाधराला भोसकलं तो दुसरा, तो मीं मोरींत टाकला होता, तिथून तो कसा नाहींसा झाला मला माहित नाहीं. म्हाताऱ्यानं कबूल केलं कीं मागच्या परड्यांत जाऊन मीं तो चाकू भिरकावून दिला. तपासणीला पाठविलेल्या चिरगुटांवर आणि मातींत रक्त असल्याबद्दल केमिकल ॲनलायझरकडून रिपोर्टहि आला. संशयित वस्त्रं किंवा माती एका विशिष्ट रसायनात घालून धुतलीं कीं वस्त्रावरचे डाग कितीही धुऊन काढलेले असले व मातींत रक्त कितीही मिसळलेलं असलं तरी या रसायनाच्या थेंबांत मायक्रोस्कोपैला रक्त दिसतं. या पद्धतीनं पहाणी

करण्यांत आली होती व केमिकल ॲनलायझरनं रक्त सांपडल्याचा निर्णय कळविला होता. इतका पुरावा आणि जबान्या गोळा केल्यानंतर फौजदारांनीं केस तयार केली व कोर्टापुढें मांडली.

या केसच्या निकालांत एकच अडचण होती व फौजदारांना वाटत होतं कीं ती मात्र फार मोठी आहे. ती म्हणजे गंगाधरनं मरतेवेळीं दिलेला जबाब ! त्यानं स्वच्छ सागितलं होत कीं, मी कीर्तनाहून परत येऊन बाकावर झोपलो होतों तिथेंच कुणीतरी मला बाहेरून भोसकलं. हा त्याचा असंदिग्ध लेखी जबाब असल्यामुळें येशाला खुनी ठरवून शिक्षा द्यायला कोर्ट कदाचित् कचरेल असा चांगलाच संभव होता. कारण परिस्थितीचा पुरावा कितीहि भक्कम असला, इतकंच नव्हे तर आरोपीनं गुन्ह्याची कबुली दिलेली असली तरी कायदा असा आहे कीं, मयताच्या मरतेवेळचा जबाब हा सगळ्यांत मोठा निर्णायक पुरावा समजला गेला पाहिजे. शिवाय गजरा, यशवंत, व म्हातारा यांनीं जरी कबुली जबाब दिले होते तरी तीं सारीजणं प्रत्यक्ष कोर्टांत उलटून आपले जबाब नाकबूल करतील असा संभव होता.

त्याप्रमाणं झालंहि. वकिलाच्या सल्ल्यावरून त्या सर्वांनीं कोर्टांत गुन्हा नाकबूल केला; आणि त्यांचा वकील गंगाधराच्या मरतेवेळच्या जबाबावर भर देऊं लागला. परंतु सरकारी वकिलानं खुनाची जागा कोर्टाला प्रत्यक्ष तेथें नेऊन दाखविली व कठड्याच्या बाहेरून गंगाधर भोसकला जाणं कसं अशक्य आहे याबद्दल कोर्टाची खात्री करून दिली; आणि गंगाधरच्या जबानीची मीमांसा त्यानं केली कीं स्वतःच्या आणि गजराच्या नावावर डाग येऊं नये या एकाच उदात्त हेतूनं प्रेरित होऊन त्यानं तसा जबाब दिला असणं अगदीं संभवनीय आहे...शेवटीं कोर्टानं यशवंताला गुन्हेगार ठरवून काळ्यापाण्याची शिक्षा दिली. मयताच्या मरतेवेळच्या जबाबाविरुद्ध दिलेला एक निकाल म्हणून या केसची नोंद विशेष लक्षांत ठेवण्यासारखी केस म्हणून लॉ रिपोर्टमध्यें झाली.

खुनी रक्ताचे डाग कितीहि धुतले तरी, मातींत मिसळले, तरी त्यांना वाचा फुटल्यावांचून रहात नाहीं; हा विचार म्हाताऱ्याच्या मनांत जन्मभर राहिला. चारित्र्यावरचा डाग रक्ताच्या डागापेक्षांहि भयंकर आणि कधीं न

पुसला जाणारा म्हणतात, पण तसा अनुभव मात्र या चमत्कारिक आणि दुर्दैवी प्रकरणांत आला नाहीं. गंगाधर मेला, भाऊ काळ्या पाण्यावर गेला, म्हणून गजरान मनस्वी दुःख करून घेतलं. पण पांच-सहा महिन्यां-नंतर ती पुन्हा जगाकडे पाहूं लागली आणि तिच्याकडे जेव्हां जग पाहूं लागलें तेव्हां असे कांहीं पुरुष होतेच की ते तिच्या पूर्व चरित्राकडे दुर्लक्ष करायला तयार होते आणि तिचं तारुण्य, तिचा गोड स्वभाव, देखणेपणा एवढ्या गोष्टी त्यांच्या दृष्टीला दिसत होत्या. रत्नागिरीस माडाच्या झाडाचं कंत्राट घेणाऱ्या एका बऱ्यापैकीं सधन गृहस्थानं गजराला मागणी घातली, आणि तिच्याशीं लग्न केलं. या गृहस्थाचं नांव लक्ष्मण मोहिते. त्यानं गजराचं नांव मंजुळा असं ठेवलेलं आहे, आणि लखूचे समवयस्क मित्र 'मोहित्याची मंजुळा' म्हणून तिचा उल्लेख करतात.

एकदां पुष्कळ दिवसाच्या मुक्कामासाठीं मी रत्नागिरीस गेलों असतांना रोज सकाळीं नीरा प्यायसाठीं मी लक्ष्मणच्या घरीं जात असें. माणसाचं आगतस्वागत करण्याची त्याला मोठी हौस होती, आणि तो लवकरच माझ्याशीं ऐसपैस बोलूं लागला. एके दिवशीं आमच्याकडे तो चहा प्यायला आला असतांना त्यानं आपल्या शर्टवर चहा सांडून घेतला. मीं म्हटलं, "त्या डागावर ताबडतोब पाणी चोळा म्हणजे तो डाग जाईल."

तो किंचित् हंसला व म्हणाला, "काय करायचंय् पाणी ? यापेक्षांहि मोठाले डाग आपोआप धुतले जातात अन् दिसेनासे होतात !"

त्याच्या उद्गाराचं मीं कौतुक केल्यासारखं त्याला वाटावं म्हणून मी थोडासा हंसलो. पण खरं म्हणजे त्याच्या उद्गारातली खोच मला कळली हें त्याला कळलं की नाहीं याचा अदमास घ्यायसाठीं मी त्याच्याकडे निरखून पहात होतों.

## मुलाखत : १

छोट्या टेबलावरच्या वर्तमानपत्रांकडे त्यांची नजर वळली. ती उचलून घेऊन वाचण्याची त्यांची इच्छा नव्हती. सर्वांत वरच्या वर्तमानपत्रावर "किसान" असं नाव होतं. जाड ठशांतल्या त्या तीन अक्षरांवरून त्यांचे डोळे फिरले, पण त्याच्या मनात विचार निराळेच चालू होते. खिडकीकडे जावं म्हणून ते कोचावरून उठणारच होते, पण तितक्यांत 'किसान'च्या पहिल्याच पानावरचा सात कॉलमी आडवा मथळा त्यांच्या नजरेस पडला. "पंतप्रधान आणि एक बुढ्ढा किसान!" त्यांनीं वर्तमानपत्र उचलून घेतलं आणि ते वाचूं लागले.

"कानपूर जिल्ह्यांतील एका गांवचा ऐंशी वर्षांचा म्हातारा शेतकरी गंगाराम चार दिवस आपल्या जांवयाकडे राहण्यासाठीं दिल्लीस गेला होता. तो फार निराश होऊन परत आला आहे. आपल्या देशाच्या राजधानींत आपण आलों तर पंतप्रधानाची भेट घेऊन त्यांना अभिवादन करावं अशी त्याची इच्छा होती. त्याचं त्यांच्याशीं काम काय असणार ? पण त्याची एवढीच इच्छा कीं आपण आपल्या खेड्यावर परत गेलों कीं "अरे भाई, मी पंतप्रधानांची भेट घेऊन आलों बघा !" असं गांवकऱ्यांना मोठ्या अभिमानानं सागतां यावं, पण त्यानं खटपटीची शिकस्त केली तरी त्याचा हेतु कांहीं साध्य झाला नाहीं. दफ्तरांतला जो तो हपीसर त्याला विचारी, पंतप्रधानांशीं तुझं काम काय आहे ? तो म्हणे माझं काम काहीं नाहीं. मला फक्त त्याना भेटायच आहे. त्याला उत्तर मिळे, कामावाचून पंतप्रधान कुणाला भेटत नाहींत. अखेर बिचाऱ्यानं तो नाद सोडून दिला. अतिशय

निराश होऊन तो परत आला आहे. तो म्हणतो, पंतप्रधानांची भेट इतकी मुष्किल असावी हें ठीक नाहीं. आमचं राज्य आहे, पतप्रधान आमचे आहेत, तर माझ्यासारख्या सामान्य माणसालादेखील त्यांची गांठभेट घेतां आली पाहिजे. मला काय त्यांच्याशीं कांहीं मागायचं होतं थोडंच ? त्यांना प्रत्यक्ष पाहायचं, मुजरा करायचा, ठीक आहे ना विचारायचं, परत यायचं, येवढीच माझी इच्छा होती. कुणालाहि अशी इच्छा असेल. पण माझी कुणी दादच घेईना ! मला हात हालवीत परत यावं लागलं. हे पंतप्रधान आमचे आहेत असं नाहीं आता मला वाटत..."

त्यांनीं तो "किसान"चा अंक दूर ठेवला. ते स्वतःशींच हसले. दिल्लीला जाणाऱ्या प्रत्येक माणसाची गाठ घ्यायचं पंतप्रधानांनीं ठरविलं तर त्यांची काय दशा होईल ?... पण लगेच त्याच्या मनात असंहि आलं, की एखाद्या माणसाला पतप्रधानांची भेट घ्यावी असं वाटलं तर त्याची इच्छा पूर्ण होणं अगदीं अशक्य असावं हेंसुद्धां कांहीं बरं नव्हे. लोकशाहींत असं असू नये. अशा माणसाला मुलाखत द्यायची म्हटलं तर पंतप्रधानांचा कितीसा वेळ जाईल ? फार तर दोन मिनिटं. पण तेवढ्यानं त्या माणसाला केवढा हर्ष होईल ! आणि पंतप्रधान आपल्यांतलेच आहेत अशा कल्पनेनं देशातल्या लाखो सामान्य माणसाना केवढा आनंद वाटेल !... एखाद्या साध्या नागरिकाला पंतप्रधानापर्यंत जाऊन पोचणं इतकं अशक्य आहे ? शेकडों छोट्यामोठ्या हपीसराच्या कडेकोट बंदोबस्तांत पंतप्रधान खरोखरच सामान्य माणसाच्या दृष्टीनं अगदी गडप झालेले आहेत ?...

त्याच्या मनांत कांहींतरी कल्पना आली असावी. त्याचे ओठ हसूं आल्याप्रमाणं विलग झाले. त्यानीं आपल्या मनगटावरच्या घड्याळांत पाहिलं आपण पोषाख घालून तयार आहोंत याची खात्री करून घेण्यासाठीं आरशांतल्या प्रतिबिंबाकडे पाहिलं. मग त्यांनीं टेलिफोन उचलून म्हटलं,

"मला दिल्लीला ट्रंक कॉल हवा आहे. सेक्रेटारिअट !"

"सेक्रेटारिअट ? जी हां."

थोड्या वेळानं कॉल लागला. ते म्हणाले, "मला पंतप्रधानांशीं बोलायचं आहे."

दुसऱ्या टोकाशीं थोडी खोटी झाली. टेलिफोनवर खडखड आवाज झाला. पहिल्याहून निराळा, जरा घोगरा आणि आदबशीर आवाज ऐकूं आला—" कोण बोलतंय ? "

" माझं नांव रामचरण अग्रवाल. "

" पंतप्रधानांशीं बोलायचं आहे आपल्याला ?

" जी हां. "

" कशाबद्दल ? "

" मुलाखतीसाठीं वेळ ठरवून घ्यायची आहे. पंतप्रधानांची भेट घेण्याची इच्छा आहे. "

" कोणत्या कामासाठीं ? "

" काम—? —अं... काम तसं कांहीं नाहीं. फक्त त्यांची गांठ हवी आहे. नमस्ते करून कुशल विचारण्यापुरती. "

दुसऱ्या टोकाच्या इसमानं गोंधळल्याप्रमाणं पुटपुट केली. " आपली व पंतप्रधानांची पहेछान आहे ? "

" न...नाहीं. पण एक नागरिक या नात्यानं—"

" थांबा हं. " फोन दुसऱ्या हातांत गेल्याप्रमाणें आवाज झाला. निराळी व्यक्ति बोलूं लागली. " हॅलो ! रामचरणसाहेब ? आपलं पंतप्रधानांशीं काय काम आहे तें मेहेरबानी करून सांगाल काय ? "

ते म्हणाले, " माझं काम असं कांहीं नाहीं. पण मी दूरच्या गांवाहून इथं राजधानींत आलों आहें; आणि पंतप्रधानांची भेट घेता आली तर परत गांवीं गेल्यावर मोठ्या अभिमानानं तें मी लोकांना सांगेन आणि तें ऐकून माझ्या गांवकऱ्यांनाहि फार आनंद होईल. "

फोनवरच्या माणसानं दोनदां खांकरल्यासारखं केलं व म्हटलं, "रामचरण-साहेब, आपल्याला हे ध्यानात ठेवलं पाहिजे कीं पंतप्रधानांना क्षणाचीदेखील फुरसत नसते. कामावांचून कुणाला भेटत नाहींत ते."

" पण तसं म्हटलं तर माझ्यासारख्याची भेट घेणं हें देखील कामच नाहीं का ? पंतप्रधानांची भेट झाली, ते एखादा शब्द माझ्याशीं बोलले तर मला अभिमान वाटेल. हा देश माझा आहे, हें राज्य माझं आहे,

पंतप्रधान माझे आहेत असं मला वाटेल. माझी हकीगत ऐकून साऱ्याच लोकांना तसं वाटेल. पंतप्रधान कुणालाहि भेटतात असं साऱ्यांना वाटूं लागेल. त्याना पंतप्रधानाविषयी आपुलकी वाटेल. हें काम कांही कमी महत्त्वाचं नाहीं–"

"हां–" फोनच्या दुसऱ्या टोकाशीं बोलणारी व्यक्ति हंसली असावी.

ते म्हणाले, "बघा तुम्हीच. दोन मिनिटं पंतप्रधान मला भेटतील असं करा. त्यांनाहि आनंद होईल अशी माझी कल्पना आहे—"

दुसऱ्या टोकाशीं कांही संभाषण आणि विनोद झाला असावा. "जरा थांबा हं!"

"जरूर." असं म्हणून त्यानीं आपल्या घड्याळांत पाहिलं. अर्धा मिनिट गेल्यावर त्यांना पुन्हा ऐकूं आलं,

"हॅलो."

"हां."

"हें पाहा रामचरणसाहेब, तुम्ही मागता तशी मुलाखत खरं म्हणजे देतां येत नाहीं. कुणी मागत नाहीं. पण–पण मीं पंतप्रधानांच्या उद्यांच्या कार्यक्रमांची यादी पाहिली तेव्हा—"

"हं?"

"उद्यां ते भयंकर कामांत आहेत. तथापि पांच मिनिटांचा अवधि काढतां येईल. दुपारीं १२-४५ ला ते आपल्या कचेरींत सह्या करीत बसलेले असतील. एक वाजतां ते जेवायसाठीं उठतील. एकाला पांच मिनिटं कमी असतांना तुम्ही आलांत तर तुमची–त्यांची दोन मिनिटांपुरती भेट होण्याची व्यवस्था मी करीन. दोन मिनिटं पुरतील ना तुम्हाला?"

"रगड! मी तुमचा फार आभारी आहें—"

"तुम्ही आपल्या नांवाची चिठी दारावर द्या."

"ठीक ठीक." असं म्हणून टेलिफोन बंद करतांना ते खुदकून हंसले...पंतप्रधान भेटत नाहीत असं कसं होईल? सामान्यांतल्या सामान्य नागरिकालाहि त्यांची मुलाखत मागण्याचा आणि ती मिळेल अस

समजण्याचा हक्क आहे. तो आपला हक्क नाहींसा झाला कीं राज्याचा आधारच गेला...असं कधीं होता कामा नये...

खोलीच्या दारावर टकटक् आवाज झाला. एक स्थूल गृहस्थ हसत आंत आले व आदबीनं म्हणाले,

" पंतप्रधानांच्या भेटीसाठीं आलेलं इंडिअन चेंबर ऑफ कॉमर्सचं शिष्टमंडळ खालच्या दिवाणखान्यांत वाट पाहात आहे. "

" मी पोषाख करून तयार आहे. "

" शिष्टमंडळाची भेट आटपली कीं पंतप्रधानांना ऑल इंडिया रेडिओंत जायचं आहे. ' माझं बालपण ' या विषयावर भाषण–"

खिशातले कागद चाचपीत ते म्हणाले, " हां. भाषण घेतलं आहे मीं बरोबर. "

जिन्यावरून भराभर पायऱ्या उतरून जाताना ते मनाशीं विलक्षण प्रसन्नतेनं हसत होते. ( कल्पना इंग्रजीवरून )



# अभ्यंग स्नान : १०

" मोटार जरा थांबवतोस का? "

" कां? "

" मी मागं बसतें. "

" तें कां? "

" या कांचेंतून उन्हाची तिरीप माझ्या डोळ्यावर पडते आहे सारखी."

" मग मान माझ्या खाद्यावर ठेव आणि डोळे मिटून घे. "

" शिवाय—"

" शिवाय काय? "

" तूं पुन्हां पुन्हा माझ्याकडे पहात रहातोस आणि तुझा डावा हात फार खट्याळपणा करतो. ड्रायव्हिंगकडे तुझं नीट लक्ष रहात नाहीं. म्हणून म्हणतें तुझ्यापासून दूर मागं बसूं दे मला. "

" शीः! असं कुठं झालंय? अशी जवळच हवीस तूं मला. " असं म्हणून चिंतामणीनं नलिनीच्या भोंवतीं आपला डावा हात टाकला आणि तिला झटकन् ओढून तिचा मुका घेतला.

" अरे! पुढें रस्त्याला वळण आहे लक्ष ठेव. ती एक ट्रक आली पाहिलीस का समोरून? " असं ओरडून नलिनी त्याच्या मिठींतून दूर सरकूं लागली.

समोरून येणारी ट्रक अतिशय वेगात होती. तिला चुकवून चिंतामणीनं मोटार वळेविली तेव्हां दोन्ही गाड्यांचे ब्रेक वाजले आणि धुळीचा मोठा लोटच्यालोट उठला. केवळ एका केसाच्या अंतरानं टक्कर टळली, अशा

कल्पनेनं नलिनीनं एक निःश्वास सोडला व ती चिंतामणीपासून दूर सरकून म्हणाली,

" पाहिलंस, तुझं लक्ष नाहीं समोर रस्त्याकडे. मला मागं बसूं दे, माझ्याशीं सारखा बडबडत राहू नकोस. आणखी गाडी जरा कमी वेगानं हांक. इतकी घाई कसली झाली आहे तुला ? "

" घाई कसली झाली आहे ? अः ! तुला काय सांगूं, तुला कळत नाहीं ? नले, तुला नाहीं घाई झालेली ? "

" मला नाहीं कसली घाई झालेली. चावट कुठला, " तिनं मुरका मारला आणि त्याच्यापासून शक्य तितकं दूर बसून पदर डोक्यावर घट्ट ओढून घेतला. पदराच्या आड देखील तिनं आपला चेहरा समोर ठेवला नाहीं, तो डाव्या बाजूला वळवून ती पहात राहिली.

" इतकं वारं सुटलंय वाटतं ? " चिंतामणीनं तिची चेष्टा केली.

नलिनी काहींच बोलली नाहीं.

" खरी सृष्टिशोभा इकडे उजव्या बाजूला आहे, बर का. या खाचराच्या रागा, त्यात ठिकठिकाणी उभे राहिलेले बगळे, पलीकडची दाट झाडी, आणि दूरवरचे ते रंगीबेरंगी डोंगर ! बघ तरी इकडे. "

नलिनीन तोंड वळविलं नाहीं. आणि ती बोललीहि नाही.

" रामरावची ही गाडी इतकी सुंदर चालत असेल अशी नव्हती माझी कल्पना. पण किती छान चालली आहे ! बघ मी ड्रायव्हिंगमध्यें पटाईत आहे हे आतां तरी कबूल करशील कीं नाहीं ? नले, आपण गाडी घ्यायची ती याच मेकची. आता चार पांच हजारांत गाडी मिळते. चार सहा महिन्यांत आपण गाडी घेऊं शकूं. कारण माझा हिशोब असा आहे—"

" किती बडबड करशील रे ? जरा गप्प बसून निमूटपणें गाडी हांक कीं. तुझी सदा गडबड अन् बडबड. मला नाहीं हें आवडत. " असं म्हणून नलिनी जी गप्प झाली ती कांहीं केल्या बोलेना.

चिंतामणीला प्रथम वाटलं होतं कीं ती केवळ थट्टा विनोद म्हणून बोलेनाशी झाली आहे परंतु त्यानं कितीही प्रश्न केले तरी ती जेव्हां उत्तर देईना तेव्हां त्याच्या मनांत एक शंका आली व तो गंभीर झाला. त्याला

वाटलं, आपला एकंदर बेतच तिला आवडलेला नाहीं व त्यामुळं ती आपल्यावर रुसलेली आहे. दिवाळीचे चार दिवस दोघांनींच दूर कुठेंतरी जाऊन एकत्र घालविण्याची कल्पना त्यानं प्रथम तिला सांगितली होती तेव्हां तिनं कपाळाला आठ्या घातल्या होत्या, हें त्याला आठवलं. तिच्या मनांतली खरी इच्छा अशी होती कीं दिवाळसणासाठीं त्यानं तिच्या घरीं यावं. नलिनी फार श्रीमंत आईबापांची मुलगी होती. त्यांनीं जांवईबापूंना दिवाळसणाचं आमंत्रण दिलं होतं, व तो मोठ्या थाटानं साजरा करण्याची त्यांची इच्छा होती. परंतु चिंतामणीला नलिनी जरी आवडत होती, तरी तिचे आईबाप फार श्रीमंत होते ही गोष्ट त्याला आवडत नव्हती. त्याच्याशीं लग्न करण्याचं जेव्हां नलिनीनं ठरवलं होतं तेव्हां तिची आई, तिचे भाऊ, भावजया, या सर्वांनीं त्याच्याविरुद्ध जंगी संयुक्त आघाडी उघडली होती. नलिनीचे वडील आबासाहेबच काय ते लग्नास अनुकूल होते व त्यांच्या पसंतीच्या जोरावरच अखेर नलिनीचं व त्याचं लग्न झालं होतं. नलिनीच्या घरीं आपण दिवाळसणासाठीं गेलों तर मोठा थाट उडेल हें त्याला माहीत होतं; परंतु तो त्याला नको होता. नलिनीच्या घरांत भाऊ, बहिणी, भावजया, त्यांचीं मुलं, नोकर माणसं यांची संख्या इतकी मोठी होती कीं साऱ्या दिवाळींत आपण व नलिनी एकमेकांपासून दूरच राहूं अशी भीति त्याला वाटली होती आणि शिवाय दिवाळीचे दिवस खूप मजेंत व चैनींत घालविण्याची योजना आपण स्वतंत्रपणें करून दाखवावी आणि नलिनीला चार दिवस आनंदांत ठेवावं, अशी महत्त्वाकांक्षा त्याच्या मनांत उत्पन्न झाली होती. आपण गरीब असूं, परंतु चार दिवस चिकार मजेंत घालविण्याइतका पैसा आपल्याजवळ आहे, मग जावईबुवा म्हणून सासुरवाडीचा श्रीमंती पाहुणचार आपण आयतोबासारखा कां घेऊन यायचा असं त्याला वाटलं होतं. म्हणून तो नलिनीला पुनः पुन्हां म्हणाला होता,

" दिवाळीला तुझ्या घरीं कशाला जायचं ? आपण दूर कुठेंतरी एकांत जागीं आपला दिवाळसण साजरा करूं या. "

नलिनी त्याला पुनः पुन्हां म्हणाली होती, " असं काय करतोस रे ?

आपल्या लग्नानंतरची ही पहिली दिवाळी. माझ्या आईबापांकडून तुझं कोडकौतुक झालेलं पहावंसं मला वाटतं—"

"अग, तें कोडकौतुक आतां जन्मभरच होणार आहे."

"तरी पण—"

"नले, माझं ऐक. आपण आपली दिवाळी स्वतंत्रपणें साजरी करूं या. तुला अशी खूष करून टाकतों बघ तरी—"

मग अखेर नलिनीनं त्याच्या म्हणण्याला संमति दिली होती. मात्र ती तिनं मनापासून दिली नसावी, आईबापांच्यापासून आपण दिवाळीच्या सणांत दूर असावं या विचाराचं तिला दुःख होत असावं, आणि कांहीं झालं तरी आपण गरीब तेव्हां आपण कितीशी मजा करणार अशी शंका तिच्या मनांत असावी, असं चिंतामणीला सारखं वाटत राहिलं होतं. या विचारानं मग तो अधिकच इरेस पेटला होता. दिवाळींत करावयाच्या चैनींचा बेत त्यानं फारच मोठ्या प्रमाणावर आंखला होता. तो मनाशीं म्हणाला होता, 'नलिनीला वाटत असेल, तिचे आईबाप मोठे श्रीमंत, मी गरीब. ते दिवाळ-सणाचा जो जंगी थाट उडवतील त्या मानानं मी तिला कितीशी मौज देणार? माझी कांहीं गरुडाची झेंप नव्हे, कोंबडीची झेंप! ती कितीशी मोठी असणार? चैन चैन ती मी काय करणार? पण मलाही एक-प्रकारची पैज जिंकायची आहे. असा बेत उडवून देईन कीं आपण आपल्या आईबापांकडे गेलों असतों तरी इतक्या मजेंत राहिलों नसतों अशी कबुली नलिनीनं दिली पाहिजे'—आणि या ईर्षेनं त्यानं दिवाळीच्या सणासाठीं एक बेत आंखला होता. सृष्टिशोभेनं चिकार गजबजलेल्या शांत, स्तब्ध घाटमाथ्यावरच्या एका बंगल्यांत नलिनीला घेऊन रहाण्याची त्यानं कल्पना काढली होती...

नलिनी त्याला म्हणाली होती, "डोंगरावर हवेच्या ठिकाणीं बंगल्यांत रहावं असं तुझ्या मनात आहे ना. कांहीं हरकत नाहीं. आमच्या आबा-साहेबांचा माथेरानला एक बंगला आहे. मी त्यांना पत्र लिहिलं तर ते आनं-दानं आपली राहायची सोय करतील."

" छे, छे छे ! नले, तसलं कांहीं करूं नकोस. तुझ्या घरची श्रीमंती उसनी घेऊन मला मजा करायची नाहीं. "

" असं काय करतोस रे ? आबासाहेबांचा बंगला तो आपलाच बंगला नाहीं वाटतं ? "

" आपला म्हण पाहिजे तर पण तो नको आपल्याला. मी स्वतंत्रपणें सारा बेत आंखणार आहे. "

" असा हट्टी आहेस तूं ! " नलिनी अखेर म्हणाली होती.

तिला आपला बेत मनापासून आवडलेला नाहीं हें चिंतामणीला स्पष्ट दिसलं होतं. पण तो मनाशीं सारखं म्हणत राहिला होता, "आतां नाराज आहेस तूं. पण अखेर तुला खूष करून टाकीन तरच नांवाचा चिंतामणि." दिवाळीच्या चार दिवसांत नलिनी अगदीं चिकार आनंदांत राहील यासाठीं काय काय केलं पाहिजे याचा नीट हिशोब करून त्यानं मग एकंदर बेताची आंखणी केली होती.

त्याचा दोस्त रामराव कावळे याचा घाटमाथ्यावर एक छोटासा सुंदर बंगला होता, तो त्यानं चार दिवसांसाठीं मिळविला. चिंतामणीनं आपला बेत त्याला सांगितला तेव्हां रामराव त्याला म्हणाला,

" अरे यार, बंगला देईन कां म्हणून काय विचारतोस ? वाटेल तितके दिवस जाऊन रहा तिथं. माझा कारकून व माळी तिथें आहे, त्यांना मी पत्र लिहितों. ते तुमची सारी व्यवस्था उत्तम ठेवतील. आपल्या छोकरीला घेऊन जा आणि मजा कर चार दिवस. बंगला तुझा आहे असं समज. " चिंतामणि म्हणाला, " थॅंक्यू व्हेरी मच. पण रामराव, आगगाडीनं प्रवास करण्याची आपली नाहीं बुवा इच्छा. शिवाय बंगल्यावर चार दिवस रहायचं व मजा करायची म्हणजे इकडे तिकडे हिंडतां आलं पाहिजे, तुझी मोटार पाहिजे आपल्याला. "

रामराव म्हणाला, " अरे, पाहिजे तर नाहीं कोण म्हणतो लेकाचा ! खुशाल घेऊन जा माझी गाडी. एवढंच कीं ती सध्या कारखान्यांत टाकली आहे. ती तुझ्या वेळेवर तयार होते कीं नाहीं पहायचं. पण चिंता

करूं नकोस. आज मी कारखान्यांत जातो व सागतों गाडी लवकर तयार करायला. तुला नक्की कोणत्या दिवशीं गाडी तयार पाहिजे, बोल. "

" दिवाळी अकरा तारखेला सुरू होते. दहा तारखेला रात्रीच्या मुक्कामाला बंगल्यावर पोंचतां आलं पाहिजे आम्हांला. दहा तारखेला चार वाजतां आमची स्वारी बॅंकेला बुट्टी देऊन बाहेर पडणार, घरीं येणार, अन् तडक नलिनीला घेऊन मोटारनं निघणार. "

" कुछ फिकिर नहीं. दहा तारखेला दोन वाजतां माझी गाडी तुझ्या दाराशीं येऊन उभी राहील. "

" आणि हें बघ रामराव, तुझा ड्रायव्हर नको मला हं. "

" कां रे त्याची अडचण होईल म्हणून होय ? बरं, बरं. माझा ड्रायव्हर नाहीं येणार, पण माझी गाडी कुठे खड्ड्यांत घालूं नकोस म्हणजे झालं. "

" आणि गाडी कंप्लीट दुरुस्त पाहिजे हं. नाहींतर कुठेंतरी ती मला दगा देईल आणि साराच घोटाळा होईल. "

" अगदीं फर्स्टक्लास करून देतों रे गाडी तुझ्या ताब्यात. तुला कां फिकिर ? जा जा. आपल्या छोकरीला घेऊन जा. आणि मनसोक्त चैन कर. "

अशा प्रकारें गाडी मिळाल्यावर चिंतामणीनं बाकीचीहि व्यवस्था अगदी फर्स्टक्लास केली होती. बंगल्यावरच्या चार दिवसाच्या मुक्कामांत खाण्यापिण्याची चंगळ उडाली पाहिजे म्हणून त्यानें पक्वान्नासाठीं लागणाऱ्या साऱ्या जिनसा, फळफळावळ, मिठाई, अनेक प्रकारचीं सरबतें, सुका मेवाहि खरेदी केला होता. व हा सारा सरंजाम एका आचाऱ्याच्या स्वाधीन करून त्यांत त्याला दोन दिवस आधीं बंगल्यावर पाठविलं होतं. आपण व नलिनी दहा तारखेस बंगल्यावर येऊन पोंचूं त्या वेळेस अगदीं बादशाही थाट तयार असला पाहिजे असें त्यानं त्या आचाऱ्याला बजावलं होतं. ही सारी तयारी त्यानं गुप्त रीतीनं केली होती. बंगल्यावरची बरदास्त पाहून नलिनी चकित झाली पाहिजे, व रामराव कावळ्याच्या बंगल्यावर चार दिवस मजा केल्यावर अशी मजा घरच्या दिवाळसणांत आली नसती अशी कबुली तिनं दिली पाहिजे, अशी त्यांची इच्छा होती.

मात्र आपण जें करीत आहोंत तें नलिनीला पसंत नाहीं, तिला दिवाळ-सणाला घरीं जायचं होतं, व तिचं आपण ऐकलं नाहीं म्हणून ती आपल्या-वर नाराज आहे, असं त्याला सारखं वाटलं होतं.

आतां जेव्हां ती तोंड फिरवून डोक्यावरून पदर ओढून घेऊन अगदीं बोलेनाशी झाली तेव्हा त्याला असंच वाटलं कीं तिला आपण अशी नेत आहोंत व तिच्या आईबापापासून दूर कुठें तरी दिवाळ—सण घालविण्यास भाग पाडीत आहोंत याबद्दलचा रुसवा तिच्या मनांत आहे.

तिनं खुषींत यावं व बोलावं म्हणून त्यानं पुष्कळ प्रयत्न केला. मग तो मनांतल्या मनात म्हणाला, 'बरं, बरं नको बोलूस, रूस. आता बंगल्यावर गेल्यावर तुझी कळी कशी आपोआप उमलूं लागेल तें मी पाहीनच कीं !' तो समोर रस्त्याकडे दृष्टि ठेवून मोटार चालवूं लागला. गाडी अगदीं त्याच्या मनाप्रमाणें चालली होती. एंजिनचा 'सूं' असा आवाज मोठा मजेदार होत होता. त्या आवाजात आवाज मिसळून तो 'तानसेन' चित्रपटातलं गाणं गुणगुणूं लागला.

'वो दिन याद करो......'

तितक्यांत पावसाचे टपोरे थेंब मोटरच्या टपावर व काचेवर वाजूं लागले. रस्ता थोडा थोडा ओला होऊं लागून भिजलेल्या मातीचा वास सुटला. वारा जोरानं वाहूं लागला. आभाळांत मोठमोठे ढग एकदम जमून आले. अजून घाट पंधरावीस मैल दूर होता आणि घाट चढून गेल्यावरही चार सहा मैलांची मजल करायची होती. दिवेलागणीच्या आंत बंगल्यावर पोंचण्याची चिंतामणीची इच्छा होती. त्यानं पेट्रोलवर जोरानं पाऊल दाबलं. त्याबरोबर चढलेल्या आवाजांत 'सूं' करीत एंजिन काम देऊं लागलं, आणि गाडी खूपच वेगात निघाली.

नलिनी म्हणाली, "चिंता !"

"हां सरकार !"

"चावटपणा करूं नकोस. किती वेगानं निघाला आहेस ?"

"सरकारस्वाऱ्या दिवेलागणीच्या आंत पोंचतील अशी वर्दी पुढें गेली आहे."

नलिनी एकदम खुदूकन् हंसली. तें पाहून चिंतामणि एकदम खुषींत आला. तो म्हणाला,

"तुझ्या अंगावर पाऊस येत असेल तर माझ्याजवळ सरक."

ती थोडीशी जवळ सरकली व म्हणाली, "फार मोठा पाऊस येणार असं दिसतंय रे."

"येऊं दे. त्यानं आपल्याला गांठायच्या आंत आपण सूंबाल्या करूं."

त्यानं पेट्रोलवर आणखी जोरांत पाय दाबला. पण काय आश्चर्य, गाडीचा वेग वाढण्याऐवजीं तिच्या पाठीमागच्या नळींतून बंदुकीचे बार व्हावे तसे ठो ठो असे आवाज झाले. नतर गरम् गरम् गरम् असे एंजीन-मधून आवाज निघून गाडीचा वेग नाहींसा झाला, आणि वीस पंचवीस यार्ड सरपटत जाऊन ती आजिबात थांबली. चिंतामणीनं ती पुन्हां सुरूं करण्याची परोपरीनं खटपट केली, परंतु कांहीं केल्या ती सुरूं होईना. तो खालीं उतरला, त्यानं हॅंडल गरगरा फिरवून पाहिलें. परंतु एंजिनमधला पंखा कांहीं केल्या फिरेना. त्यानं झाकण उघडलं. नट फिरवून पाहिले, अखेर रस्त्यानं जाणाऱ्या चार पांच खेडुतांना गाडी ढकलायला लावली. पण कशाचाहि उपयोग होईना...

नलिनी म्हणाली, "आतां रे!"

चिंतामणि मनांतल्या मनांत संतापला होता, पण त्यापेक्षांहि अधिक खजील झाला होता. अशाप्रकारें अकस्मात् नादुरुस्त होणाऱ्या त्या गाडीचा त्याला विलक्षण राग आला होता. पण त्याबरोबरच अशा विचारानं खाजिल झाला होता, कीं आपण मारे चिकार मौज करण्याच्या बढाया नलिनीजवळ मारल्या होत्या, 'बघ तरी' असं आव्हान तिला दिलं होतं, व आतां 'प्रथमग्रासे मक्षिकापातः' असं होत होतं. घाटाच्या अलिकडच्या जंगलाच्या या जागीं पावसांत अडकून पडायची वेळ आली होती! नलिनी मनांतून आपल्यावर खचित खूप रागावली असेल, 'चांगलं दिवाळसणा-साठीं घरीं जायचं मी म्हणत होतें तें ऐकलं नाहीं. मजेचा बेत करूं म्हणून हट्ट धरलांत. खाशी मजा आणलीत माझ्या वांट्याला!' तिच्या दृष्टीनं आपली फजीती झाली होती. आणि सगळ्यांत चीड आणणारी गोष्ट होती

ती, ही कीं जे घडत होतं त्याच्यावर आपल्या हातीं कांहीं उपाय नव्हता. मोटारच्या पेट्रोलच्या नळींत बहुतेक काही तरी आडकलं असावं व पेट्रोलचा प्रवाह बंद झाला असावा, म्हणून त्यानं पंप मारून पाहिला, सगळं कांहीं केलं पण ती मोटार काहीं केल्या सुरू होईना. एखादा निष्णात मेकॅनिक कदाचित् मोटारची नादुरूस्ती पाच मिनिटात काढूं शकेल, पण या जंगलांत मेकॅनिक आणायचा कोठून ? आणि याच वेळेस नेमका पाऊस सुरू झाला होता. खालीं उतरून मोटारची खटपट करतां करतां चिंतामणि अर्धा मुर्धा भिजून गेला होता. श्रमांनीं आलेला घाम व वरून पडणारा पाऊस या दोहोंचे ओघळ त्याच्या कपाळावरून वहात होते. ते पाहून नलिनी अखेर त्याला म्हणाली,

"भिजतो आहेस रे तूं. मरूं दे ती मोटार. इकडे ये आणि आंत बैस. हा पाऊस उघडेपर्यंत आंता काहीं आपली इथन सुटका होत नाही."

चिंतामणि गाडींत चढून तिच्याजवळ बसला व तिला हलकेंच म्हणाला,

"नले, माझ्यावर रागावूं नकोस. मला क्षमा कर."

पावसाची सर अजून बेताचीच होती, पण ढगाचा गडगडाट होत होता. विजा चमचमत होत्या, लवकरच तुफानी पाऊस होणार अशी लक्षणं दिसत होतीं. पावसाची धार थोडी हळूं वाजूं लागली कीं चिंतामणीला वाटे, पावसाचा जोर कमी होत आहे, वादळ होईल असं दिसत नाहीं; पण तितक्यात सरीचा आवाज अधिक वाटल्याचा त्याला भास होई आणि मग त्याच्या मनांत येई आतां वादळ होणार खास. त्याला मध्येंच वाटे, कुणाची तरी अकल्पित मदत मिळून आपली गाडी सुरूं झाली तर आपल्याला घाटमाथ्यावरच्या बंगल्यावर पोचायला फारसा उशीर होणार नाहीं. परंतु या ठिकाणीं या वेळीं त्याच्या मदतीला कोण धांवणार हा मोठाच प्रश्न होता. आणि जर कुणाची मदत मिळाली नाहीं, आणि इथें या पावसांत आणि या जंगलांत गाडींत बसून रात्र काढायची वेळ आली तर—या 'तर'च्या पुढचे शब्द नुसते मनांत आले तरी चिंतामणीला शरम वाटत होती. 'दिवाळीच्या आदल्या दिवशीची रात्र अशी उपाशीपोटीं व रानात काढायची वेळ

तुझ्या मूर्ख हट्टानं आली बरं का. मी चांगलं म्हणत होतें, दिवाळसणासाठीं आमच्या घरीं जाऊं,' असं नलिनी आपणाला म्हणाली तर तिचें तें म्हणणं आपल्याला मुकाट्यानं खालीं मान घालून ऐकावं लागेल असं चिंतामणीच्या मनात सारखं येत होतं. त्यानं जन्मांत कधी परमेश्वराची प्रार्थना केली नव्हती, पण आतां तो परमेश्वराला म्हणूं लागला, " तूं खरोखरच दयेचा सागर असशील तर एखादी गाडी माझ्या मदतीला धाडशील." परंतु आजपर्यंत त्यानं परमेश्वराची आठवण ठेवली नव्हती या त्याच्या पापाबद्दल परमेश्वरानं त्याला चांगलंच प्रायश्चित द्यायचं ठरविलं होतं असं दिसलं. पंधरा मिनिटं गेलीं, अर्धा तास झाला, पाऊण तास झाला तरी देखील त्या रस्त्यानं एक देखील मोटार अगर ट्रक फिरकली नाहीं.

पावसाचा जोर मात्र आतां कमी झाला होता. तें पाहून गाडी चालू करण्याचा पुन्हा प्रयत्न करावा अशा विचारानं चिंतामणि खालीं उतरला. एंजिनचं झाकण उघडून त्यानं पुन्हां नटबोल्ट फिरविले आणि एंजिनपुढचा दांडा तो जोरानं फिरवू लागला. लहानपणीं एकदा आईस्क्रीमच्या यंत्राचा दांडा त्यानं असाच तासभर फिरवला होता. यंत्रातलं दूध कांहीं केल्या गोठलं नव्हतं, त्याची त्याला आठवण झाली. त्याच्या उजव्या हातांतून कळ उठूं लागली तेव्हां त्यानं दाडा फिरवण्याचं बंद केलं. त्यानं गाडीला लाथ मारली व अगदीं असभ्य शिवी हांसडली.

तितक्यात रस्त्यावर एकदम प्रकाशाचा झोत पडला व पावसाच्या धारा त्या झोतात चमकलेल्या त्याला दिसल्या. एक गाडी येत होती खास!...चिंतामणि रस्त्याच्या मधोमध उभा राहिला. व येणाऱ्या गाडीला खूण करण्यासाठीं त्यानं आपले दोन्ही हात वर उचलले. जंगलांतल्या सडकेवर मधोमध पावसात उभे राहून आपण हातवारे करीत आहों हे दृश्य नलिनीला हास्यास्पद वाटत असेल खास असा विचार त्याच्या मनांत आल्यावांचून राहिला नाहीं. परंतु हास्यास्पद असो अगर कसंहि असो, त्याला ही येणारी गाडी थाबविणं भाग होतं. त्या गाडीवरचा ड्रायव्हर कदाचित् आपल्या मोटारची नादुरुस्ती काढू शकेल अशी त्याला आशा होती.

त्याची ही आशा कांहीं खोटी ठरली नाहीं. त्याची खूण पाहून ती येणारी गाडी थांबली. बर्मा शेल कंपनीची पेट्रोलची भली जंगी टाकी वाहून नेणारी ट्रक होती ती. तिचा ड्रायव्हर खालीं उतरला व चिंतामणीनं त्याला विनंति केली तेव्हां त्याच्या गाडीजवळ येऊन तो ती तपासून पाहूं लागला. एखाद्या मांत्रिकानं पांच मिनिटात साप अगर विंचू उतरवावा त्याप्रमाणें त्या ड्रायव्हरनं इकडे तिकडे चांचपून पाहून व स्पॅनर हातीं घेऊन थोडी खटपट करून चिंतामणीला म्हटलं,

" साहेब, आतां गाडींत बसा पाहूं आणि करा स्टार्ट ! मी दांडा मारतो. हं. ! " आणि काय आश्चर्य, दांड्याचे पुरते दोन फेरेहि त्यानं फिरविले नसतील तोंच पंखा सुरूं होऊन तें एंजिन धडधड करूं लागलं. त्या ट्रकच्या ड्रायव्हरनं दांडा काढून चिंतामणीला आणून दिला व म्हटलं. " आतां चालेल बघा चागली गाडी. " काय नादुरुस्ती झाली तें त्याला विचारावं असं चिंतामणीला क्षणभर वाटलं, पण त्यानं विचार केला, विचारून काय रायचं आहे ? गाडी सुरूं झाली हा मुख्य मुद्दा. त्यानं हात बाहेर काढून त्या ड्रायव्हरच्या हातावर एक नोट ठेवली व म्हटलं, " थॅंक यू. " " हें काय साहेब, छे छे हें नको. " असं म्हणून तो ड्रायव्हर नोट परत देऊं लागला.

" छे छे ! घ्यायलाच पाहिजे तुम्ही. " असं म्हणून चिंतामणीनं परत त्याच्या हातावर नोट दाबली व, " तुमचे फार उपकार झाले हं. " असं म्हणून गाडी सुरूं केली. चांगली चाळीस मैलाच्या वेगानं गाडी जाऊं लागली. त्यानं स्वतः त्या गाडीची परोपरीनं विनवणी केली तरी ती हट्टानं एके जागीं उभी राहिली होती आणि त्या ट्रकच्या ड्रायव्हरनं जरा कानमंत्र देतांच आतां पहा ती कशी व्यवस्थित आणि नखरेबाजपणानं चालली होती. पाया पडतील त्यांना झिडकारणाऱ्या आणि रोज रात्रीं बायको बडवायचं ज्याला व्यसन आहे अशा एखाद्या मवाल्यापुढें नरमणाऱ्या लहरी बाईप्रमाणें रामरावच्या या गाडीनं वर्तन केलं होतं. ट्रकच्या ड्रायव्हरनं निव्वळ अंगारा लावून पिशाच्च घालवावं त्याप्रमाणें तिचा अडेलतट्टूपणा घालविला होता. त्यानं खरोखर नुसता नांवाला हात लावला होता. खचित परमेश्वरानं त्याला

धाडला असला पाहिजे. किंवा प्रत्यक्ष परमेश्वरच त्याच्या रूपानं आला असला पाहिजे. दामाजीला सोडविण्यासाठीं ज्या परमेश्वरानं विठू महाराचं रूप घेतलं त्याला ड्रायव्हरचं रूप घेणं असंभवनीय थोडंच होतं ! तो खरोखरच परमेश्वर असेल तर आपण त्याच्या हातावर ठेवलेली इंग्रज राजाच्या छापाची नोट पाहून तो हंसला असेल खचित् ! मात्र परमेश्वराला एवढी विनोदबुद्धी असेल अशी चिंतामणीला खात्री वाटेना.

मनांतले हे विचार नलिनीला बोलून दाखवावेत असं चिंतामणीला फार वाटलं. पण त्यानं तसं केलं नाहीं. कारण ती अजूनहि रुसून बसल्या-सारखी दूर बसली होती व तिनं आपला पदर डोक्यावरनं आणखीच घट्ट घेतला होता. तो मनांतल्या मनांत तिला उद्देशून म्हणाला, "बैस, खुशाल रुसून बैस. आता बंगल्यावर पोचून आत पाऊल टाकल्याबरोबर एक रुसलेलं माणूस खुशींत येऊन हंसेल तें मी पाहीनच की." त्यानं गाडी आणखी वेगानं काढली.

पण घाटांत पावसाची खूपच झोड होऊन गेली होती. आतां चांगलीच रात्र होऊन अंधार पडला होता. घाटांतली वळणं फार वाईट होतीं. त्यातच ठिकठिकाणीं पाण्याचे लोंढे वहात होते. लहान मोठे दगड रस्त्यावर येऊन पडले होते. गाडी अतिशय सावकाश काळजीनं चालविणं भाग होतं. घाट संपल्यावर पांच सहा मैलांचा रस्ता होता तोहि कमीअधिक चढउताराचा होता व गाडी वेगानं चालविणं अशक्य होतं.

अखेर ज्या ठिकाणीं बंगले होते त्या ठिकाणच्या नाक्यावर चिंतामणि येऊन पोंचला तेव्हां रात्रीचे नऊ वाजले होते. रामराव कावळ्यांचा बंगला त्यानं पूर्वी कधीं पाहिला नव्हता. नाक्यापाशीं उजव्या हाताला एक वाट फुटली होती व ती डोंगराकडे चढत गेली होती. या वाटेच्या दुतर्फा झाडाझुडुपांनीं आच्छादिलेल्या मोठमोठ्या अंगणाच्या मागं लपलेले पंधरा-वीस बंगले होते. आपण दिवसां उजेडी पोचूं व मग कोणालाहि विचारलं तर रामराव कावळ्यांचा बंगला कोणता तें आपल्याला सहज कळेल असा चिंतामणीनं निघण्यापूर्वी विचार केला होता. पण त्याचा तो हिशोब आतां उलटा सुलटा झाला होता. आतां पाऊस अगदीं थांबला होता पण त्या

नाक्याच्या आजुबाजूस चिटपांखरूं देखील दिसत नव्हतें. चिंतामणीनं गाडी उभी केली व ज्याला रामराव कावळ्याचा बंगला विचारता येईल असं कुणी माणूस भेटतं का याची तो वाट पाहूं लागला. परमेश्वराच्या सहाय्यावर आतां त्याचा विश्वास बसल्यामुळें त्यानं मनांतल्या मनांत प्रार्थना केली,—"परमेश्वरा—"

आणि काय आश्चर्य, त्यानं देवाचं नांव घेतल्याबरोबर समोरून एक माणूस हातांत हरिकेन कंदील धरून रस्त्यावर काठी आपटीत समोरून येत असतांना त्याला दिसला. तो जवळ आला तेव्हां चिंतामणि म्हणाला,—

" अहो मिस्टर, रामराव—"

तो कंदिलवाला म्हणाला, " राम राम. "

चिंतामणीनं राम राम म्हटलं नव्हतं. त्यामुळें त्यानं राम राम म्हणावं याचं चिंतामणीला आश्चर्य वाटलं. पण तें मनावेगळं करून त्यानं विचारलं, " रामराव कावळ्याचा बंगला आहे ना इथें ?—"

त्या माणसानं कानामागें एक हात धरून विचारलें, " आ ? "

तो बहिरा असावा हें चिंतामणीच्या लक्षांत आलं. त्यानं आवाज चढवून विचारलं, " रामराव कावळ्यांचा बंगला कुठें आहे, माहीत आहे काय ? "

" हां हां, चांगला आहे. "

" अहो, चागला आहे कीं कसा आहे नाही विचारलं. कुठें आहे ?"

" या छोट्या रस्त्यानें चढून वर जा. डाव्या अंगाला चवथा बंगला. "

" ठीक, ठीक. चवथा काय ? थँक यू. तसदी दिली माफ करा. "

तो माणूस म्हणाला, " हां हा साप फार आहेत इकडे. " आणि आपली काठी आपटीत रस्त्यानं पुढं निघून गेला.

चिंतामणीनं गाडी उजव्या हाताकडे वळवून त्या अरुंद चढणीच्या रस्त्यानं हाकावयास सुरुवात केली. मोटरच्या पुढच्या दिव्यांच्या प्रकाशात तो डाव्या हातचीं फाटकं मोजीत होता. तीन फाटकं ओलांडल्यावर तो अर्धवट स्वतःशींच व अर्धवट नलिनीला ऐकूं जावं या हेतूनं म्हणाला, " आतां पुढचाच बंगला आपला. "

चवथं फाटक दिसलं तेव्हां त्यानं गाडी वळवून त्या फाटकांतून आंत नेली. पण तिथें तो पहातों तों जिकडे तिकडे अंधार होता. त्यानं जोर-जोरांत हॉर्न वाजविला. परंतु कुणी नोकर धांवून आला नाहीं, किंवा कुणाची चाहूलही लागेना. शेजारच्या कुठल्यातरी बंगल्यांत दोन चार कुत्रीं मात्र मोठमोठ्यादां भुंकूं लागलीं. चिंतामणि मनांतल्या मनांत चांगलाच चाट झाला. रामराव तर म्हणाला होता कारकुनाला व माळ्याला सारी व्यवस्था जय्यत तयार ठेवण्याबद्दल पत्र लिहिलं आहे. शिवाय त्यानं स्वतः आचारी आणि खंडीभर सामान पुढं पाठवून दिलं होतं. आणि आता या ठिकाणीं कुणाचाच पत्ता नव्हता ! आणि बंगल्यांत दिवाही नव्हता ! रामरावच्या नोकरांना व आचाऱ्याला जंगलातल्या वाघानं पकडून नेलं, कीं ते सारे साप चावून मरून गेले, की काय झालं तरी काय ? हा आहे काय भुताटकीचा प्रकार ? चिंतामणीला वाटलं, नलिनीपुढे आपली जी फजिती होणार आहे तिला आता पारावार नाहीं; आणि या साऱ्या गोंधळाबद्दल ती आपल्या जन्मात क्षमा करणार नाहीं...

तो खालीं उतरला व ओल्या झालेल्या चिकट तांबड्या मातीवरून कशीबशी पावलं टाकीत बंगल्याच्या दाराशीं गेला. त्यानं दार ढकललं. तों तें उघडलं. आत जाऊन त्यानं भिंत चाचपडून पाहिली. त्याच्या हाताला बटन लागलं तें त्यानं ओढतांच लख्खकन् दिवा लागला. 'ठीक आहे. दिवे तरी शाबूत आहेत. नशीब म्हणायचं.' मग त्यानं दोन्ही बाजूच्या खोलींत जाऊन दिवे लावले व बाहेर येऊन नलिनीजवळ जाऊन तो तिला म्हणाला,

" नले, उतर. हाच आपला बंगला. कांहीं तरी घोटाळा झालेला दिस-तोय. पण हरकत नाहीं. तूं उतर आणि बंगल्यांत जा. मी तुझी आणि माझी सूटकेस आणि बरोबर आणलेली छोटीशी फराळाची करंडी घेऊन येतो. अखेर आपण बंगल्यावर येऊन पोंचलों हें कांहीं थोडं नाहीं. सकाळीं उठल्यावर पाहूं काय घोंटाळा झाला आहे तो. पण कांहीं कां असेना आप-ल्याला रात्र मजेंत आरामशीर पलंगावर एकमेकांच्या कुशींत निजून काढतां येईल हें काय थोडं झालं ? "

नलिनी उतरली. तिनं बंगल्याकडे पाहिलं व ती खुदकन् हंसली असावी असं चिंतामणीला वाटलं. ती म्हणाली, " चिंता, फार दमलें आहे रे ! आणि भूक अशी लागली आहे—"

चिंतामणि म्हणाला, " पाव, लोणी, केक्स, केळीं, सफरचंद आहेत माझ्याबरोबरच्या करंडींत. त्यावर मारूं या हात. करायचं काय ? " त्यानं एकदम तिला जवळ ओढून तिचा मुका घेतला व तो म्हणाला, " नले, मला माफ कर हं, पण असं झालं—"

" आंत चल बाबा आधीं. केव्हां एकदां अंग टॉवेलनं पुसून काढीन असं झालंय. " ती धांवत गेली व जातांना तिच्या सॅंडल्सना जेव्हा तांबड्या चिकट मातीचे लचके चिकटले व तिचीं पावलं झटकलीं तेव्हां अर्धवट भीतीनं व अर्धवट त्या प्रकाराची गंमत वाटली म्हणून ती ओरडली, " अय्या ! "

चिंतामणीनं सूटकेस व करंडी काढून हातांत घेतली व तोहि धांवत तिच्या मागोमाग बंगल्यांत शिरला. त्यानं पाहिलं तों मधल्या दिवाणखान्यांत एका कोचावर सपशेल हातपाय पसरून नलिनी उताणी पडली होती. सूट-केसेस् व करंडी ठेवून तो तिच्याजवळ गेला व म्हणाला, " नले, तुला फार त्रास झाला. पण आतां मी सारं करतो बघ. तूं उठूं सुद्धा नकोस. मी टॉवेलनं तुझं अंग कोरडं करतों, तुझ्या तोंडाला पावडर लावतों, लिपस्टिक लावतो, मग करंडींतून फराळाचं काढून मी माझ्या हातानं तुला भरवितों."

" मला फार झोंप आली आहे रे. " असं म्हणून नलिनीन मोठी जांभई दिली. ती त्रासून तसं म्हणाली कीं इथें कोचावर आरामशीर पडल्यावर तिचा राग नाहींसा झाला म्हणून म्हणाली तें चिंतामणीला ठरवितां आलं नाहीं. परंतु त्या गोष्टीचा निर्णय करायला त्याला सवड नव्हती. चटकन दूर होऊन त्यानं आधीं आपली व तिची सूटकेस उघडली व स्वतःसाठीं परीटघडीचे कपडे काढले. त्यानं आपल्या अंगावरचे ओलेचिंब झालेले कपडे ओरबाडून काढले व टॉवेल कमरेला गुंडाळून तो न्हाणी-घराकडे धांवला. नलिनी डोळे मिटून पडल्या पडल्या त्याची चाहूल ऐकत होती. प्रवासाच्या शीणानं तिला गुंगी आली. त्या गुंगींतून ती जागी झाली

तेव्हां चिंतामणि गुडघे टेकून आपल्याजवळ बसला आहे व आपल्या ब्लाऊजचीं बटनं काढीत तो कांहींतरी बोलतो आहे असं तिला वाटलं. तिनं अधिक जागं होण्याचा प्रयत्न करण्यासाठीं डोळ्यांची उघडझांप केली. तो तिला म्हणत होता,

" तुझं सारं अंग मी टॉवेलनं पुसून काढतों. मग आपण थोडं खाऊं, आणि—" तिनं मान हलवून पुन्हां डोळे मिटले व म्हटलं. " मला खायला कांहीं नको. तूं दूर हो पाहूं, मला निजूं दे. अशी झोंप आली आहे कीं—"

तिचं बोलणं रुसव्याचं व वैतागाचं होतं असं चिंतामणीला वाटलं. तो प्रेमानं म्हणाला, " नले, रागवूं नकोस. मला क्षमा कर. अशा ओल्या कपड्यानिशीं झोंपणार कीं काय तूं ? छे छे ! मी तुझं अंग पुसतों बघ. तूं अशी कोचावर पडून राहा. " त्यानं तिच्या ब्लाऊजचीं बटन काढायला सुरवात केली. त्याच्या हाताचा स्पर्श तिच्या वक्षःस्थळांना झाला तेव्हां गोड गुदगुल्यांनीं सर्व अंग शिरशिरल्याप्रमाणें तिनं शहारे दिले व एकदम त्याचे दोन्ही हात पकडून ती मोठमोठ्यांदा हंसली. ती म्हणाली, " तूं नको माझं अंग पुसूं. तुझा चावटपणा माझ्या लक्षांत आला. मी पुसतें अंग, आणखी नवे कपडेही करतें. पण तूं इथून जा पाहू. जा ! "

तिच्या त्या बोलण्यांत अजूनहि थोडासा राग होता अशी शंका चिंतामणीला आली. ' रागावूं नकोस ' अशा अर्थाची मुद्रा करून त्यानं प्रेमभरानं तिच्याकडे पाहिलं मग तो म्हणाला, " बरं, बरं. तूं आपलं अंग कोरडं करून नवे कपडे घाल. तंवर इथल्या जेवणघराच्या कपाटांत बश्या, पेले, ग्लास, काटे, चमचे सांपडतात का पहातों मी. हा टॉवेल, ही तुझी साडी, ही आंतली चोळी, हें ब्लाऊझ, ही क्रीम, ही पावडर, हा कंगवा—"

" आधीं तूं जा पाहूं. इथनं—" ती म्हणाली.

त्यानं काहींसा शरमिंदा चेहरा केला, पण मग तो तिच्याजवळ थांबला नाहीं. जेवण घरांत काय काय सामान मिळतं तें पहाण्यासाठीं तो लगबगीनं तिकडे गेला.

एकीकडे अंग पुसून कपडे बदलून चेहरा ठाकठीक करतां करतां जेवण घरांत चितामणीची खटपट चालली होती ती नलिनी ऐकत होती. कपबशांचे व काटया चमच्यांचे आवाज तिला ऐकू येत होते. ती स्वतःशीं हंसत होती—

परंतु तितक्यांत चितामणीची किंकाळी तिला ऐकूं आली व बऱ्याचशा कपबशा व ग्लास खालीं फरशीवर पडून फुटेल्याचा खळाळकन् आवाजहि तिच्या कानीं आला. ती धांवतच तिकडे गेली.

" चिंता ! काय रे झाल ? "

" माझ्या पायावरून केवढा तरी साप गेला. या कपबशांची मोठी कुतुब-मिनार करून मी तुझ्याकडे येत होतों इतक्यात माझ्या पायावरून मऊमऊ व गारगार कांहीं जातंयसं मला वाटलं. पहातों तो भलाजगी नाग. अस्सा लांब आणि पिवळा धमक ! "

तें ऐकून नलिनीनं किंकाळी फोडली व म्हटलं, " चिता, आतां या ठिकाणीं एक क्षणभरसुद्धा मी रहाणार नाहीं. सापाची मला भयंकर भीति वाटते. चल बाबा चल. या बंगल्यात रहायचं नाहीं आता. "

" अग, तो नाग त्या मोरीकडे गेला. एव्हाना तो बाहेर पडून पसार झाला असेल. तो काय आता पुन्हां येणार आहे होय ? "

" पण मी आतां या बंगल्यांत रहाणार नाहीं अन् चिंता, तुलाहि राहूं देणार नाहीं. "

" अग पण नले, या वेळेला जायचं कुठं रस्त्यावर ? "

" रस्त्यावर मसणांत वाटेल तिथें. पण या बंगल्यांत रात्र काढणं अशक्य आहे बाबा. हा सारा तुझ्या हट्टाचा परिणाम ! दिवाळीच्या आदली रात्र किती मजेनं घालवायची. पण तूं हें ओढून घेतलंस आपल्या वांट्याला. आतां कसलं पहांटेचं स्नान अन् कसली दिवाळी. "

बोलतां बोलतां ती अगदीं रडकुंडीस आली.

हातांत उरलेल्या कपबशा चिंतामणीनं झटकन् टेबलावर ठेवल्या व नलिनीला ओढून आपल्या मिठींत घेऊन तिचे मुके घेत घेत तो तिची

समजूत घालूं लागला. त्याच्या प्रेमळ आर्जवांनीं नलिनीनं अखेर आपला हट्ट सोडला व फराळ करून बंगल्यांत निजायचं कबूल केलं. ती म्हणाली,

" मात्र माझी एक अट आहे हं. "

त्यानं विचारलं, " कोणती ? "

" रात्रभर खोलींत दिवा ठेवला पाहिजे. "

तो हंसून म्हणाला, " हात्तीच्या ! ही अट तर माझ्या फायद्याची आहे—"

त्याच्या बोलण्यांतला गर्भितार्थ लक्षांत येतांच नलिनीनं मोठाले डोळे करून म्हटलं, " चिंता, अरे सदा कसा तुझा चावटपणा ! आपण अशी संकटांत सापडलों आहोंत आणि तरी तुला सगळा ध्यास—"

तो हळूंच तिच्या कानांत म्हणाला, " नले, माफ कर. परंतु आजच्या रात्रीकडे माझं सारं लक्ष लागून राहिलेलं आहे. मी किती व्यवस्था केली होती याची तुला कल्पनाहि नाहीं. ती सारी व्यवस्था बारगळली कशी माझं मलाच कळत नाहीं. तुला फार फार सुख द्यायचं मी ठरविलं होतं. परंतु माझा सगळा बेत वाया गेला. तुला वाटत असेल आपण ही रात्र तुझ्या घरीं ऐषआरामात काढली असती, तें राहिलं बाजूला आणि इथें रानावनांत रात्र काढायची वेळ मी तुझ्यावर आणली. मी किती सुंदर व्यवस्था केली होती तें आतां तुला सांगून काय उपयोग ? पण माझ्यावर रागावूं नकोस. अशी काय पहातेस माझ्याकडे ? बोल ना. फार रुसलीस होय ? "

कांहीं बोलण्याऐवजीं नलिनी मोठमोठ्यांदां हंसूं लागली. ती म्हणाली, " चिंता तूं अगदीं एक नंबरचा गाढव आहेस. तुला कांहीं कळत नाहीं. अरे मी रागावले असं कसं समजतोस ? उलट तुझ्यावर अगदीं भयंकर खूष आहे. "

गोड आश्चर्याच्या धक्क्यामुळें चिंतामणि डोळे फाडून तिच्याकडे क्षणभर पहात राहिला. मग त्यानं विचारलं, " नले, खरं म्हणतेस ? " त्यानं तिचे पटापट मुके घेतले.

ती म्हणाली, " खरं ! मी इतकी आनंदांत आहे कीं कांहीं विचारूं नकोस. मला त्रास होऊं नये, मी रुसू नये, मी मजेंत रहावं यासाठीं तुझी चाललेली खटपट व तुझी गोड बडबड यामुळें माझ्या अंतःकरणांत आनंद मावेनासा झाला आहे. तुझं माझ्यावर इतकं प्रेम आहे हें इतक्या स्पष्टपणें मला पूर्वी कधीं कळलं नाहीं. माझ्या घरीं आपण दिवाळ–सणास गेलों असतों तर तुझ्या प्रेमाची कल्पना आली नसती. पण आज अगदीं पुरती आली. तो पाऊस, तें वादळ आणि इथें आल्यावरची सारी तारांबळ, सगळंच किती मौजेचं वाटलं मला. दिवाळीच्या आदली रात्र अशा मजेंत कुठल्याहि पतीपत्नींच्या वाटयाला येत नसेल. माझा लाडका चिंता."

असं म्हणून तिनं त्याचा मुका घेतला, आणि त्यानं तिला छातीशीं अगदीं घट्ट घट्ट धरलं—

तितक्यात बाहेरच्या खोलींत कुणाच्या तरी पावलांचे फरशीवर आवाज झाले. कोणीतरी ओरडून विचारीत होतं, " अरे कोण, आहे कोण इथें ? हें सामान कुणाचं ? सारे दिवे लावलेले ? हा आहे काय प्रकार ? कोण आहे ? "

अशा प्रकारें तो बाहेर आलेला इसम ओरडत जेवणघराकडे पावलं टाकीत आला. चिंतामणि व नलिनी यांनीं दचकून पाहिलं तो हातांत एक भला जंगी सोटा घेऊन दाराच्या चौकटींत उभा राहिलेला त्यांना दिसला. चिंतामणीनं रागानं विचारलं.

" कोण रे ? असा आरडाओरडा करायला तुला शरम नाहीं वाटत ? " चौकटींत उभा असलेला तो माणूस चिंतामणीच्या प्रश्नानं चाटच झाला असावा. बोलता बोलतां उंचावलेला त्याचा हात खालीं झाला, व त्याच्या हातांतली काठी फरशीवर वाजली ती नरमपणानंच. पण त्याच्या मुद्रेवरचे आश्चर्य एक क्षणभरच टिकलं, पहिल्यापेक्षां अधिक उंच स्वर काढून त्यानं विचारलं,

" काय रे ए, बंगल्यांत खुशाल शिरलास, जणूं काय तुझ्या बापाचा बंगला अशा समजुतीनं इथं आपलं सामान ठेवलंस, या पोरीबरोबर गुजु गुजु गोष्टी करीत इथें उभा आहेस, आणि शरम नाहीं वाटत म्हणून मला

या बंगल्याच्या रखवालदाराला विचारतोस होय ? चोराच्या उलट्या बोंबा खऱ्या. ”

त्याच्या स्वराच्या वर आपल्या स्वराची पट्टी चढवून चिंतामणीनं म्हटलं, “ तूं या बंगल्याचा रखवालदार होय ? ठीक, बरं झालं. आतां या एकंदर घोटाळ्याबद्दल कुणाच्या तोंडांत चार भडकावयाच्या तें कळलं मला. रखवालदार, आतां बाहेर व्हा पाहूं. सकाळीं या मला रामराम करायला. मग सांगतों. ”

“ अरे त्येच्या ! मलाच दम भरतोस होय ? चांगला मुरलेला डाकू दिसतोस. कां पंजाबांतून कोण ‘रफूजी’ कां कोण इकडे पुण्यामुंबईकडे आले आहेत आणि वाटेल त्याच्या घरांत शिरताहेत, त्यापैकीं आहेस ? कोण, आहेस तरी कोण ? कोण आहेस, बोल. ”

“ मी नाहीं सांगत मी कोण आहे तें. तुझ्या मालकाला विचार ! मी पण उद्यां तुझ्या मालकाला तार करतो व तो तुला खेटरं मारील अशी व्यवस्था करतों. ”

हातांतला सोटा सरसावीत व पुढें पावलं टाकीत रखवालदार म्हणाला, “ आतां मुकाट्यानं तूं या छबकडीला घेऊन बाहेर पडतोस कीं—”

नलिनीला दूर ढकलून चिंतामणि उजव्या शर्टाची बाही डाव्या हातानं सरकवीत पुढें झाला, “ फार सैल सुटली आहे रे जीभ तुझी ! ” असं म्हणून त्यानं रखवालदाराच्या तोंडांत भडकविण्यासाठीं हात वर उचलला.

आतां मारामारी होणार असं वाटून नलिनी ओरडली, “ चिंता हात मागं घे. ”

चिंतामणि म्हणाला, “ तूं गप्प बैस नले. या रखवालदाराला पाहुण्यांशीं कसं वागावं तें शिकविलंच पाहिजे. ”

रखवालदार हंसून म्हणाला, “ तुम्ही आमचे पाहुणे होय ? छान ? कुणाची परवानगी न विचारतां खुशाल या बंगल्यांत शिरला कीं. असे पाहुणे यायला लागले कीं भागलंच. पक्क्या बेरडांची जात दिसते तुमची. तुम्हांला बाहेर काढलंच पाहिजे. पण तुम्ही गुण्यागोविंदानं बाहेर पडणार नाहीं असं

दिसतं. थांबा. रामराव कावळ्यांच्या बंगल्यावर जातों व तिथल्या सखाराम कारकुनाला व माळ्याला घेऊन येतो. मग पाहूं तुमचा तमाशा ! ”

असं म्हणून तो वळला व काठी आपटीत जाऊं लागला. ‘ रामराव कावळ्यांच्या बंगल्यावर’ हे शब्द ऐकतांच चिंतामणि दचकला. तो एकदम पुढें झाला, त्या रखवालदाराजवळ गेला व त्याला म्हणाला, “ ए जरा थांब, तूं कुठें निघालास म्हणतोस ? ”

“ कां, घाबरलास वाटतं ? ”

“ घाबरण्याचं राहूं दे. कुठें निघालास म्हणालास ? ”

“ रामराव कावळ्याच्या बंगल्यावर ! कां ? ”

अत्यंत आश्चर्यानं चिंतामणीनं विचारलं, “ म्हणजे ? रामराव कावळ्यांचा बंगला दुसरीकडे कुठें आहे ? हा नाहीं ? ”

“ अर्थात् नाहीं ! ” असं म्हणून तो रखवालदार क्षणभर थांबला व मग कसलीतरी आठवण झाल्याप्रमाणें त्यानं विचारलं,

“ पण काय हो, मला एक गोष्ट सागा—”

“ काय ? ”

“ रामराव कावळ्यांच्या बंगल्यावर आज मुंबईचे पाहुणे यायचे ते तर नव्हे तुम्ही ? ”

“ तेच आम्ही ! म्हणूनच तुझ्या उर्मट बोलण्याचं मला आश्चर्य वाटून तोंडांत भडकावणार होतों मी. ”

तो रखवालदार हातातला सोडगा फरशीवर टाकून खो खो हंसूं लागला व शेवटीं आपलं हंसणं आवरून म्हणाला,

“ वा राव,, खूप मजा केलीत. ! तिकडे सखाराम कारकून, माळी, आचारी तुमची वाट पाहून थकले, त्याशीं गप्पा मारूनच मी परतलों. त्या आचाऱ्यानं काय सुंदर जेवण केलंय अन् तुम्ही या बंगल्यांत शिरून बसलांत. जेवण तिकडे व जेवणारे इकडे ! ” तो पुन्हां हंसत सुटला. मग त्यानं विचारलं, “ अहो, तुम्ही रामराव कावळ्यांच्या बंगल्यावर जायचं सोडून इथें कशाला शिरलांत भलत्याच बंगल्यांत ! ”

चिंतामणि म्हणाला, " नाक्यावर मी एका माणसाला विचारलं, रामरावचा बंगला कुठचा ? त्यानं सांगितलं डाव्या अंगाला चवथा. म्हणून मी इथें शिरलों. हा बंगला कुणाचा ? "

" हा बंगला शामराव सावळ्यांचा ! तुम्ही कुणाला विचारलं ? इथला तो बहिरा चौकीदार तर तुम्हांला नाहीं भेटला ? "

" हा हां ! तो माणूस बहिरा होता खरा. " चिंतामणीच्या एकदम लक्षांत आलं कीं नाक्यावर ज्या माणसानं त्याला विचारलं तो बहिरा असल्यामुळें रामराव कावळे या नावाऐवजीं शामराव सावळे असं त्यानं ऐकलं असलं पाहिजे ! तो मोठमोठ्यादा हंसू लागला.

रखवालदारानं एकदम चिंतामणीचे पाय धरले व म्हटलं " तुम्हाला मी वाटेल तें बोललों माफ करा हं. मला काय माहीत तुम्ही रामरावांचे पाहुणे समजुतीच्या घोटाळ्यानं या बंगल्यात शिरलात तें ? रामराव कावळ्यांचा बंगला समोरच्या रांगेंत शेवटचा आहे. मी तुम्हांला दाखवितों चला, चला, तिकडे सारीं माणसं तुमचीं वाट पहात आहेत. "

चिंतामणि नलिनीकडे वळून म्हणाला, " नले, नले, बघितलंस कसा घोटाळा झाला. "

त्यानं तिच्याजवळ जाऊन तिला हातांनीं धरून ओढीत बाहेरच्या दिवाणखान्यात आणलं. दोघानी आपले कपडे सूटकेसमध्यें घातले. रखवालदारानं त्यांचं सामान मोटारींत चढविलं. नलिनी व चिंतामणि आंत बसलीं. रखवालदार फूटबोर्डवर उभा राहिला व म्हणाला, " हा चला साहेब, मीं दाखवितों बंगला. " आणि गाडी चालू झाली.

रामराव कावळ्यांच्या बंगल्याचं फाटक आल्याबरोबर रखवालदार फूटबोर्डावरून उडी टाकून धावत पुढें गेला व " सखाराम ! ग्यान्या ! अहो आचारी बाबा ! पाहुण्याना घेऊन आलों बघा " असं ओरडूं लागला.

चिंतामणीनं हॉर्न वाजवीत गाडी आंत नेली. ती पोर्चमध्यें शिरल्यावर नोकर धांवून आले. व त्यांनीं पटापटा सलाम केले. चिंतामणीनं खालीं उडी टाकली व एंजिनला वळसा घालून नलिनीसाठीं दार उघडून त्यानं तिला दोन्हीं हातांनीं उचलून अलगद बाहेर घेतलं. तसं करतां करतां

तिच्या कानांत तो हळूच म्हणाला, " बघितलंस ! " एखाद्या पांखरानं चिवचिव करावी त्याप्रमाणें नलिनी हंसली.

दुसऱ्या दिवशीं सकाळीं सूर्याचा लख्ख प्रकाश खोलींत शिरून एक-मेकांच्या कुशींत निजलेल्या नलिनी-चिंतामणीच्या डोळ्यांवर पडला तेव्हां चिंतामणि जागा झाला, नलिनीचे केस कुस्करीत तो म्हणाला, " ए पोरी ऊठ ! " ती म्हणाली, " गप्प रे. "

" उन्हं किती वर आलीं, पाहिलींस काय. पहाटेचं स्नान बुडलं कीं. "

मऊ उशीच्या खळगींत त्याच्या दंडावर टेकलेली मान हालवून नलिनी म्हणाली, " असं कां म्हणतोस ? पहांटे किती तरी सुंदर अभ्यंग स्नान मी केलं. आणि तुलाही घातलं. तुझ्या स्पर्शाचं सुगंधी उटणं अंगाअंगाला लावलं, आणि तुझ्या प्रेमानं मी न्हाऊन निघालें ! असं अभ्यंग स्नान आज दुसऱ्या कोणीतरी स्त्रीनं केलं असेल काय ? "

चिंतामणि हंसला. त्यानं तिला घट्ट जवळ घेतलं, तिच्या तोंडाच्या उजव्या बाजूवर आपला उजवा गाल टेकून घासला, आणि तिच्या काळ्या-भोर केसांचा वास घेत तो तिच्या कानात म्हणाला " आणि असा दिवाळ-सण दुसऱ्या कोणत्यातरी जावयाच्या वाट्याला आला असेल काय ? "

तितक्यांत त्याच्या खोलीच्या दारालगत बाहेर फटाकड्यांचे सर काड्-काड् आवाज करीत उडूं लागले. त्या दोघांनीं ओळखलं कीं आपल्याला उठण्याची ही गमतीदार सूचना सखाराम कारकुनानं दिली असावी. दोघांनीं एकमेकांकडे अर्थपूर्ण दृष्टीनं पाहून हाताच्या मिठ्या घट्ट केल्या, आणि मग तीं दोघं हंसत सुटलीं.

[ या गोष्टींतील बंगल्याच्या चुकामुकीची कल्पना एका इंग्रजी गोष्टी-वरून घेतली आहे...... गोष्टीचें नाव, प्रकाशन स्थळ व लेखकाचें नांव लक्षांत नाहीं...... ]

★ ★ ★

# फडके-साहित्य

## कादंबऱ्या

१ अल्ला हो अकबर
२ कुलाब्याची दांडी
३ जादूगार
४ दौलत
५ अटकेपार
६ निरंजन
७ कलंक शोभा
८ आशा
९ उद्धार
१० काश्मिरी गुलाब
११ प्रवासी
१२ समरभूमि
१३ उन्माद
१४ गुप्त प्रायश्चित्त
१५ इंद्रधनुष्य
१६ प्रतिज्ञा
१७ वादळ
१८ शाकुंतल
१९ अखेरचं बंड
२० बस नंबर बारा
२१ जीवन–संगीत
२२ माझाधर्म
२३ झंझावात
२४ अंजलि
२५ जेहलम
२६ पतंग

## गोष्टी

१ प्रो. फडके यांच्या गोष्टी भाग १ ला
२ ” ” ” ” भाग २ रा
३ लोला आणि इतर गोष्टी
४ नमुनेदार गोष्टी
५ उल्हास कथा
६ वत्सला आणि इतर गोष्टी
७ चंद्रा आणि इतर गोष्टी
८ लाडकी लक्ष्मी आणि इतर गोष्टी
९ माझा देश आणि इतर गोष्टी
१० जिवाचं मैतर
११ बाजु बंद
१२ अत्तर गुलाब
१३ मागं वळून पाहू नकोस,
आणि इतर गोष्टी
१४ पुरुष तेवढे सारे, आणि इतर गोष्टी

## नाट्य

१ युगांतर
२ संजीवन
३ तोतया नाटककार
४ काळे गोरे
५ जानकी
६ जडावाची देवी ( नाटिका )
७ आगलावी ( ,, )
८ क्षमेसाठीं अपराध ( ,, )

## ललित गद्य

१ गुज गोष्टी
२ नव्या गुज गोष्टी
३ धूम्रवलयें
४ अबोलीच्या गोष्टी
५ मैफल
६ कमल पत्रे

## चरित्र

१ दादाभाई नौरोजी
२ टेरेन्स मॅक्स्विनी
३ डी व्हॅलेरा
४ तीन थोर देशभक्त

## प्रबंध

१ मानसोपचार
२ मानसोन्नति
३ सुखाचे संसार
४ संततिनियमन
५ आजचे तरूण स्त्री पुरुष
६ प्रतिभा साधन
७ वाङ्मय विहार
८ आधुनिक गीता
९ मानस मंदिर
१० साहित्य व संसार
११ मनोहरची आकाशवाणी
१२ वेचलेले मोती
१३ टाकीचे घाव
१४ टांकाच्या फेकी
१५ माझ्या साहित्यसेवेंतील स्मृति भा. १
१६ कोदणें
१७ शेला पागोटें

## व्याख्यानें

१ गाजलेलीं भाषणें
२ मित्र हो !
३ मंथन
४ खाडिलकरांच्या नाट्य कृती
५ किर्लोस्कर, देवल, आणि गडकरी

## काव्य

१ रुमझुम

## इंग्रजी

1 Sex Problem in India
2 Psychology
3 Social Psychology
4 Elements of Ethics
7 History of Philosophy
5 Manual of Logic
6 Birth Control
8 Leaves in the August Wind ( A Novel )
9 Birth Pangs of New Kashmir
10 Sun beams and Shadows ( Stories )